# नवभारत

जून - २०१६



- मराठीतील वैचारिक साहित्य : लेखक आणि समाज
- शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक - ४
- विचारवंत शेषराव मोरे
- मराठी साहित्यसमीक्षेचे दृष्टिकोन (१९२०-१९४०)
- जुने लेखन











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

**वर्ष ६९। अंक ९। जून २०१६**
**वैशाख/ज्येष्ठ शके १९३८**
**वार्षिक वर्गणी ४०० रुपये**
**या अंकाची किंमत रु. ४०/-**



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## जून २०१६

अनुक्रमणिका

---








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मराठीतील वैचारिक साहित्य : लेखक आणि समाज

## नरेंद्र चपळगांवकर

'' हे विशेषण मात्र सढळ हाताने व फारसा विचार न करता वापरले जात आहे, असेही आपण पाहतो. वैचारिक वाङ्मय म्हणजे कोणते वाङ्मय व विचारवंत कोणाला म्हणावे, या दोन्ही गोष्टी आपण आपल्या मनाशी निश्चित केल्या तर या दोन्ही विशेषणांचा योग्य अर्थ लक्षात घेऊन आपल्याला मराठीतील वैचारिक वाङ्मयाचा विचार करता येईल.

इतर प्राण्यांपेक्षा जी गुणवैशिष्ट्ये मनुष्यप्राण्याला श्रेष्ठ ठरवतात, त्यांतले सर्वांत महत्त्वाचे म्हणजे मनुष्याला विचार करता येतो. आपल्या भूतकाळापेक्षा वर्तमानकाळ किती चांगला अगर वाईट आहे, आपला भविष्यकाळ कसा असला पाहिजे, अशा सर्वच गोष्टींविषयी मनुष्य विचार करू शकतो. आपल्याबरोबर तो अर्थातच समाजाचाही विचार करतो. विचार करण्याची ही शक्ती प्रगतीची प्रेरणा देणारी शक्ती आहे. त्यामुळे जगात झालेल्या परिवर्तनांच्या मागे मनुष्याची विचारशक्ती ही एक महत्त्वाची प्रेरणा आहे. आपली प्रगती व्हावी अशी सततची इच्छा मनुष्याच्या मनात असते. जगाची आजवर झालेली प्रगती ही या विचारक्षमतेमुळेच झाली आहे, हेही उघड आहे. अनेक शास्त्रांचा जन्मसुद्धा विचारांमधून झाला आणि नंतर ती ज्ञानशाखा विकसित होत गेली व तिने शास्त्राचे रूप धारण केले. विज्ञानातील अनेक शोध लागण्याची प्रक्रिया विचारांशी संबंधित आहे. म्हणून शास्त्रीय वाङ्मय किंवा तत्त्वज्ञान आणि वैचारिक वाङ्मय यांच्या सीमारेषा कित्येक वेळा फार पुसट असतात.

फ्रेंच तत्त्वज्ञ रेने देकार्त याने विचार करण्याची शक्ती हीच मनुष्याच्या अस्तित्वाची खूण मानली. ज्या अर्थी मी शंका घेतो, विचार करतो, त्याअर्थी शंका घेणारा, विचार करणारा असा मी अस्तित्वात आहे, असा सिद्धान्त त्याने मांडला आहे. I think, therefore I am हे देकार्तचे सूत्र तत्त्वज्ञानातील एक महत्त्वाचा निष्कर्ष मानले जाते. मनुष्याच्या विचारशक्तीमुळेच जगाच्या अस्तित्वाबद्दल, ते निर्माण करणारा कोणी आहे का याबद्दल निसर्ग आणि माणूस यांच्या संबंधाबद्दल विचार झाला. विज्ञानात नवेनवे शोध लागले. अनेक सामाजिक शास्त्रांचा जन्म झाला आणि विकासही झाला. नवा शास्त्रीय सिद्धान्त विचार केल्याशिवाय जन्माला येत नाही आणि जुन्या सिद्धान्ताचे वैयर्थ विचार केल्याशिवाय लक्षात येत नाही. वैज्ञानिक शोधाचेही तसेच आहे. म्हणूनच शास्त्रीय वाङ्मय आणि वैचारिक वाङ्मय यांच्या सीमारेषा अनेक वेळा पुसट झालेल्या दिसतात. मात्र वैचारिक साहित्य अशी संज्ञा मराठीत आपण ज्या विशिष्ट अर्थाने वापरतो ते साहित्य आज कमी लिहिले जात आहे, याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही.

मराठी भाषेतील ग्रंथलेखनाला सुमारे आठ-नऊशे वर्षांपूर्वी प्रारंभ झाला व त्यात काही तत्त्वज्ञानानुसार ग्रंथही निर्माण झाले. मात्र ज्या अर्थाने आज आपण वैचारिक साहित्य हे विशेषण वापरतो, त्या अर्थाने लेखन एकोणिसाव्या शतकापर्यंत झालेले नाही. इंग्रजांची राजवट महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकाच्या दुस-या-तिस-या दशकात सुरू झाली. नव्या राजवटीच्या आगमनाबरोबर नवे शिक्षणही आले आणि त्या शिक्षणामुळे व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता अशी काही मूल्ये नवशिक्षितांत रुजू लागली. या मूल्यांच्या परिचयाने आपल्या देशस्थितीचा आपण विचार करावा, सांप्रतच्या राज्यव्यवस्थेचे परीक्षण करावे आणि आपल्या समाजव्यवस्थेचाही मागोवा घ्यावा, अशी इच्छा त्यांच्यापैकी काहींच्या मनांत निर्माण झाली. आपल्या व्यवस्थेत आणि समाजात असे कोणते दोष होते की, ज्यांमुळे आपण पारतंत्र्यात ढकलले गेलो, याचाही शोध घेण्याची प्रेरणा यामागे होती. असा मागोवा घेणारे लेखन करणारे आपोआपच समाजशिक्षक बनले. समाजात जागृती निर्माण करून लोकांना पारतंत्र्याचे

दुष्परिणाम सांगावेत व त्यांच्यांत स्वातंत्र्याची आकांक्षा निर्माण करावी, विषमतेने आणि अन्याय्य दुष्ट रूढींनी पोखरलेला समाज बदलण्याचा प्रयत्न करावा, या प्रेरणेने त्यांनी लेखन केले. लोकशिक्षण हाच या लेखनाचा प्रधान काय पण एकमेव हेतू होता. यासाठी जे वाङ्मय लिहिले गेले, त्याला आपण ढोबळमानाने वैचारिक साहित्य असे म्हणतो. लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख, विष्णुशास्त्री चिपळूणकर, न्या. महादेव गोविंद रानडे, लोकमान्य टिळक, गोपाळ गणेश आगरकर, महात्मा ज्योतिबा फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, स्वातंत्र्यवीर सावरकर अशांनी हे लेखन केले आहे. समाजाविषयीची कळकळ ही या लेखनाची मुख्य प्रेरणा आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात झालेल्या वैचारिक लेखनाच्या लेखकांची ही यादी परिपूर्ण नाही, केवळ उदाहरणांनी वैचारिक लेखनाचे स्वरूप लक्षात यावे म्हणून ती दिली आहे. तसेच मराठीतील वैचारिक लेखनाचा आढावा हे या भाषणाचे स्वरूप नाही, ही गोष्ट मी आवर्जून स्पष्ट करू इच्छितो. काही लेखकांची नावे आणि त्यांच्या लेखनाच्या स्वरूपाचे उल्लेख हे केवळ उदाहरणादाखल आहेत, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

मराठी वैचारिक गद्यवाङ्मय लिहिले जाण्यापूर्वी बरेचसे माहितीपर गद्य लिहिले जाऊ लागले होते. त्यात ऐतिहासिक गोष्टी होत्या, महत्त्वाच्या व्यक्तींची छोटी चरित्रे होती. अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान अशा शास्त्रांतील इंग्रजी ग्रंथांचा सारांश किंवा भाषांतर असलेली पुस्तकेही प्रकाशित होत होती. यांतली बहुतेक पुस्तके वाचकांचे गतकाळाबद्दलचे अगर अलीकडील परंतु अपरिचित घटनांबद्दलचे कुतूहल शमवणारी होती. अनेक पुस्तके युरोपात विकसित झालेल्या अर्थशास्त्र अगर राज्यशास्त्रासारख्या शास्त्रांची माहिती वाचकांना करून द्यावी व त्या शास्त्रांच्या अधिक अभ्यासासाठी त्यांना उद्युक्त करावे, यासाठी लिहिली गेली होती. यातल्या पुष्कळ लेखनाला ब्रिटिश अधिका-यांचे उत्तेजनही होते. मराठीत ग्रंथनिर्मिती व्हावी, यासाठी दक्षिणा प्राइज कमिटीसारखे उपक्रमही त्यांनी राबवले होते. या माहितीपर गद्यलेखनाची–त्यातले बरेचसे अनुवादित होते–प्रेरणा आणि वैचारिक लेखनाची प्रेरणा एकमेकींपासून पूर्णतः वेगळ्या होत्या.

एखाद्या शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी, त्यातल्या सिद्धान्तांची पुनर्मांडणी करण्यासाठी, त्यात भर घालण्यासाठी जे सैद्धान्तिक लेखन होते, त्याला आपण शास्त्रीय असे संबोधतो. अशा लेखनाचा उद्देश मुख्यतः त्या शास्त्राच्या अभ्यासाशी संबंधित असतो. तत्त्वज्ञानपर ग्रंथाचेही असेच आहे. तत्त्वज्ञानातील एखाद्या शाखेचे किंवा त्यातील एखाद्या सिद्धान्ताचे प्रतिपादन अथवा खंडन करण्यासाठी, काही मतभेद दर्शविण्यासाठी करण्यात येणारे लेखन हे तत्त्वज्ञानापर समजले पाहिजे; ते शास्त्रीय लेखनाचा एक भाग आहे. लोकमान्यांचा गीतारहस्य हा ग्रंथ या निकषानुसार तत्त्वज्ञानपर समजला पाहिजे. मराठीतील विविध शास्त्रशाखांतील अनेक ग्रंथ या काळात लिहिले गेले आहेत. अर्थात त्यांची संख्या फार थोडी आहे. जॉन स्टुअर्ट मिल आणि हर्बट स्पेन्सर अशा तत्त्वज्ञांच्या विचारांचा परिचय उच्चशिक्षण घेणा-या मराठी नवशिक्षितांचाही झाला. उदारमतवाद आणि अज्ञेयवाद यांचा परिचय झाला. या परिचयामुळे व्यक्तिस्वातंत्र्याचा एक भाग म्हणून बुद्धीच्या निकषावर प्रत्येक गोष्टीचे अस्तित्व तपासून पहावे व मगच ती स्वीकारावी, अशी शिकवण मिळाली. देशाची स्थिती कशी आहे याचा विचार करून ती सुधारण्यासाठी काय करावे, याबद्दल आपले विचार मांडण्याचा आपल्याला अधिकार आहे व ते कर्तव्य आपण केले पाहिजे, अशीही प्रेरणा नवशिक्षितांना मिळाली. ब्रिटिशांनी लादलेल्या पारतंत्र्याचा प्रतिवाद मध्ययुगीन काळाप्रमाणे शस्त्रांच्या साहाय्याने आपल्याला करता येणार नाही, हे बहुतेक सुशिक्षितांना उमगले होते. जे त्यांच्या जीवनपद्धतीत आणि राज्यव्यवस्थेत आपल्यापेक्षा अधिक श्रेष्ठ काय आहे, याचाही शोध त्यांनी घेतला होता. दीर्घकाळ अस्तित्वात असलेल्या सरंजामदारी व्यवस्थेत आणि तिने संरक्षिलेल्या समाजव्यवस्थेत कोणते दोष आहेत याचाही आपण अभ्यास करावा, असे त्यांना वाटू लागले. या दोषांचे निराकरण केले तर पारतंत्र्याकडून स्वातंत्र्याकडे जाण्याचा मार्ग सोपा होईल, असेही त्यांना वाटत होते.

या काळात मुख्यतः दोन विषयांसंबंधी वैचारिक लेखन झाले आहे. त्यांतला एक विषय म्हणजे आमच्या

अनुक्रमणिका

म्हणजे प्रामुख्याने हिंदू समाजातील सामाजिक दोष. दुसरा विषय म्हणजे पारतंत्र्याने झालेले दुष्परिणाम आणि भारतीयांच्या हिरावून घेतलेल्या प्रगतीच्या संधी. मराठी राज्याच्या शेवटच्या काळात ते आपल्या प्रजेच्या मर्जीतून एवढे उतरले होते की, ते लयाला गेल्याचे फारसे दुःख अनेकांना जाणवलेच नाही. राज्यकर्ते हेच आता आपले नवे मायबाप आहेत, अशी काहींची भावना होऊ लागली होती. "इंग्रजी अमलाच्या आधी प्रजेची दुर्दशा, मराठशाहीत दाद नाही, मक्तेदारीचा जुलूम तसेच लष्करे, शिपाई जिकडेतिकडे फिरत, त्यातून पेंढा-यांचा उपद्रव; लोक अगदी त्रासून गेले. त्यामुळे इंग्रज चांगला व इन्साफी असे लोकांस वाटू लागले व त्यांचे राज्यनिर्मितीस साह्य मिळाले", असे लोकहितवादींनीच ऐतिहासिक गोष्टींच्या पहिल्या भागात म्हटले आहे. अशा परिस्थितीत त्यांच्या मनातले स्वत्व जागृत करणे हे एक अवघड काम होते, त्यासाठी जरूर तेवढे परखड लिहून हे काम करावयाचे होते.

इंग्रजी राज्याच्या प्रारंभापूर्वी समाजात अनेक अन्याय होतेच. त्या वेळच्या समाजस्थितीबद्दल अनेकांना दुःख वाटत असणार; परंतु सरंजामी व्यवस्थेत त्या वेळची समाजव्यवस्था आणि राज्यव्यवस्था यांबद्दल आपले मत सांगावे व त्यात कोणते बदल हवेत याबद्दलची आपली मते उघडपणे व्यक्त करावीत, याची हिंमत आणि त्यासाठी विचारप्रगटनाची साधने त्या वेळी अस्तित्वात नव्हती. व्यक्तीलासुद्धा धर्म, समाजव्यवस्था, जातिव्यवस्था, रूढी, राज्यव्यवस्था आणि राज्यकारभार अशा बाबींसंबंधी विचार करून आपले मत देण्याचा अधिकार आहे, असा विश्वास निर्माण होण्याचा पाया व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना हा होता, व्यक्तिस्वातंत्र्य हे मूल्य जेव्हा मानले गेले तेव्हा म्हणजे इंग्रजी उच्चशिक्षणाच्या प्रारंभानंतर सुशिक्षित झालेल्या तरुणांच्या मनात समाजाच्या स्थितिगतीचा आपण विचार करावा, असे आले. त्यांतले अनेक तरुण परकीय सरकारच्या नोकरीत होते, तरीही त्यांना अभिव्यक्तीच्या, मर्यादित का होईना, स्वातंत्र्याचा एवढा आत्मविश्वास वाटत होता की, शासकीय नोकरीत असलेल्या लोकहितवादी गोपाळ हरी देशमुखांनी, विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आणि न्या. महादेव रानडे यांनी त्याचा यथायोग्य उपयोग केला व समाजाच्या गरजांविषयी आपली मते मांडली. आपण इंग्रजी राज्याचे सेवक आहोत, त्यामुळे आपण हे राज्य ताबडतोब नष्ट केले पाहिजे, असा विचार आपल्या मनात आला तरीही तो बोलून दाखविता येणार नाही, हे तारतम्य शासकीय नोकरीतल्या या लेखकांना होते; परंतु तरीही त्यांनी फार महत्त्वाचे काम केले आहे. इंग्रजी राज्य फार लवकर जाणार नाही, या राज्याचेसुद्धा काही फायदे आहेत, हे त्यांना कळत होते. ज्यांना आपण इंग्रजी राज्याविरुद्ध लढाऊपणे संघर्ष करणारे लोकमान्य नेते मानतो, त्या टिळकांनीसुद्धा इंग्रजी राज्यापासूनचे फायदे एका अग्रलेखात सांगितले आहेत. नव्या राजवटीने आणलेले नवे शिक्षण समाजाची परिवर्तनाची इच्छा जागृत करीत होते, प्रेरणा देत होते व त्यासाठी समाजाला शहाणे करू इच्छिणा-या विचारवंतांना लेखनाची प्रेरणा देत होते. लोकहितवादी आणि रानडेसुद्धा भविष्यकाळात भारतात येणा-या स्वातंत्र्यासाठी लोकांना सक्षम करण्यासाठीच लेखन करीत होते.

या काळात जे वैचारिक लेखन झाले, त्यात मुख्यतः चार-पाच प्रेरणा दिसतात. त्यांतली एक समाजातील जातिनिष्ठ विषमता व त्यामुळे एखाद्या जातीला इतरांचे शोषण करण्याची मिळालेली संधी याचा विरोध करणारी होती. दुसरी प्रेरणा हिंदू समाजाच्या सर्वच जातींत ज्यांना अवमानास्पद वागणूक मिळत होती व अनेक मूलभूत मानवाधिकार नाकारले जात होते, त्या स्त्रीवर्गाच्या स्थितीचा विचार करून त्यांना सन्मानाची वागणूक आणि मूलभूत अधिकार देण्याची होती. तिसरी प्रेरणा हिंदू समाजातील अंधश्रद्धा, जातिभेद व अनिष्ट रूढी यांच्याविरुद्ध लोकजागृती करण्याची होती. चौथी प्रेरणा काही जमातींना अस्पृश्य समजण्याच्या अमानुष रूढीच्या विरोधात लोकजागृती करण्याची होती. पाचवी प्रेरणा इंग्रजी राजवटीने ज्या उदार लोकशाही व्यवस्थेची ओळख प्रथम पुस्तकात नवशिक्षितांना करून दिली होती त्या लोकशाहीव्यवस्थेतील संस्था– उदा., प्रातिनिधिक विधिमंडळ आपल्याकडेही असावी, अशी मागणी करण्याची होती; त्यातच ब्रिटिश राजवटीचे परखड मूल्यमापन करून त्यातील दोष व भारतीय प्रजेवर होणारे

अन्याय उघड करण्याचीही होती. सहावी प्रेरणा परकीय राजवटीमुळे हतबल झालेल्या समाजाचा आत्मविश्वास जागृत करण्याची होती. या पाच-सहा प्रेरणांनी या काळातील वैचारिक वाङ्मय निर्माण झाले आहे.

विचारांच्या प्रगटीकरणाची सुलभ साधनेसुद्धा नव्या राजवटीमुळे आपल्याकडे आली. सार्वजनिक प्रश्नाविषयी होणारे जाहीर वादविवाद मिशन-यांमुळे आणि त्यांना विरोध करणा-या हिंदूंमुळे आपल्याकडे सुरू झाले. वृत्तपत्रे आल्यानंतर त्यांत आपले मत मांडता येते व इतरांच्या मताचा प्रतिवाद करता येतो, हेही लक्षात आले. समाजाने आपले मार्गदर्शक म्हणून ज्यांना मान्यता दिली, त्यांचे वृत्तपत्रातील अग्रलेखातून प्रगट होणारे विचार वाचक गंभीरपणे वाचू लागला. लोकमान्य टिळक, आगरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादींची उदाहरणे याबाबत सहज लक्षात येतील. त्याशिवाय ग्रंथनिर्मिती होऊ लागल्यामुळे लेखकाचे विचार वाचकांच्या संग्रही दीर्घकाळ राहू शकतील, अशी शक्यता निर्माण झाली. काही वैचारिक ग्रंथही या काळात निर्माण झाले. इंदुप्रकाश आणि प्रभाकर यांसारख्या वृत्तपत्रांतून अनेक विषयांवरील वैचारिक लेखन प्रसिद्ध झाले, त्यात अर्थातच समाजस्थिती आणि इतिहास अशा विषयांवरील चर्चेला प्राधान्य होते. काही नियतकालिके त्याच्या संपादकांचे विचार नियमितपणे लोकांपर्यंत जावे म्हणून जन्माला आली व त्यात संपादकांनी बहुधा एकटाकी लेखन केले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांची निबंधमाला हे याचे एक उदाहरण आहे. नंतरच्या काळात रघुनाथ धोंडो कर्वे यांनी समाजस्वास्थ्य मासिक चालवले आणि लोकसंख्या, संततिनियमन इत्यादी विषयांवर आपली मते मांडण्यासाठी एक हक्काचे व्यासपीठ निर्माण केले.

प्रभाकर वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या शतपत्रांनी मराठी वैचारिक साहित्याच्या प्रारंभकाळात चांगली कामगिरी केली. हिंदू समाजातील अंधश्रद्धा, जातीय वर्चस्वाचा व लोकश्रद्धेचा फायदा घेऊन इतरांना लुबाडण्याचा भिक्षुकांचा धंदा, समाजात रूढ झालेल्या अनेक वेडगळ समजुती आणि रूढी यांच्याविरुद्ध लोकहितवादींनी दंड थोपटले. गोपाळ हरी देशमुख हे जुन्या राजवटीतील एक इनामदार. आपल्या कर्तृत्वाने त्यांनी साध्या कारकुनापासून जिल्हा न्यायालयातील साहाय्यक न्यायाधीशापर्यंत प्रगती करून घेतली. १८४८ ते १८५० अशी दोन वर्षे त्यांनी सुमारे १०८ पत्रे वृत्तपत्रात प्रसिद्ध करून समाजाच्या विविध दोषांवर कडक टीका केली आणि लोकहितवादी हे आपले टोपणनाव सार्थ केले. त्यांनी विपुल लेखन केले आहे. आपल्या स्वार्थासाठी समाजातील अनिष्ट गोष्टींना पाठिंबा देणा-या ब्राह्मण समाजावर स्वतः ब्राह्मण असलेल्या लोकहितवादींनी कोरडे ओढले आहेत. त्यांनी लिहिले आहे. "पन्नास ठिकाणी पाणी शिंपणे, दोनशे ठिकाणी हात धुणे, देवपूजा आणि सोवळे मनस्वी करतात, लोकास असे वाटावे की पुण्यवान प्राणी आहे. मनाची स्थिती पाहिली तर ज्ञानशून्य, एवढा आचार ब्राह्मणांनी खटपटीचा अंगिकारला आहे... अहितकारक धर्म सर्वथैव द्वेष्य व त्याज्य होत. परंतु हितकर धर्म वंद्य, ग्राह्य होत. सती जाणे, विधवा पुर्नविवाह हाणून पाडणे, विधवेचे केशवपन करणे, बालविवाह इत्यादी लोकांस पीडा व अहित करणारे अधर्म लोकांत चालत असतील तर त्यांचा नाश करण्याविषयी सर्वदा यज्ञ करणे उचित आहे. परंतु केवळ ईश्वरभक्तीचा मार्ग असून त्यापासून कोणास काही उपद्रव व अहितप्रद असे होत नसेल, तर त्याचा द्वेष करू नये.," असे लोकहितवादींनी म्हटले आहे. (स्वाध्याय, पृ.३२५-२६)

शासकीय नोकरीत असलेल्या लोकहितवादींनी सरकारची खुशामतखोरी केलेली नाही. त्या काळी सुशिक्षितांना दिसत असलेले नव्या राजवटीचे फायदे त्यांनी निःसंकोच सांगितले. इंग्रजांना त्यांनी 'परमेश्वराने पाठवलेले गुरू' असेही संबोधले; पण त्याचबरोबर गुरुजींनी शिकवल्याबरोबर हा देश सोडून जावा व त्यापूर्वी त्यांच्या देशात आहे, तसे पार्लमेंट आम्हाला द्यावे (स्वातंत्र्य द्यावे), हेही सौम्य भाषेत सुचवलेले आहे. लोकहितवादींनी आपली लेखनामागची प्रेरणा काय आहे, हे स्पष्टपणे सांगितले आहे. "इतके श्रम जे केले, ते लोकांस त्यांची वास्तविक स्थिती कशी आहे ती कळावी, त्यांनी सुधारावे, त्यांस इहलोकी समृद्धी व्हावी, परलोकाचे साधन घडावे व बहुतकाळापासून दृढ ग्रह झाले आहेत, त्यांपैकी काही अविचाराने व काही मूर्खपणाने जडलेले आहेत, ते कमी व्हावेत किंवा नाहीसे व्हावेत, इतक्याच हेतूने मी यथामतीने व स्वेच्छेने व वेतनावाचून हे श्रम केले








आहेत."

एकटे लोकहितवादीच नव्हे तर सर्वच विचारवंतांनी कोणत्याही आर्थिक लाभाची अपेक्षा न करता समाजाबद्दलच्या आस्थेतून, कणवेतून विचार केला आणि आपले विचार निर्भीडपणे लोकांसमोर मांडले. वैचारिक लेखनाचा हा महत्त्वाचा गुण आहे. विचारवंतांचे, वैचारिक लेखन करणा-यांचे समाजाशी एक घट्ट नाते असते व या नात्यातूनच त्यांना समाजविषयक आणि समाजाला उपयुक्त होईल असा विचार करण्याची प्रेरणा होते. समाजहितैषि विचारप्रगटनाबरोबरच त्यांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी प्रत्यक्ष कृती करणा-या लोकमान्य टिळक, महात्मा फुले, विठ्ठल रामजी शिंदे किंवा डॉ. आंबेडकर यांसारख्या विचारवंतांना तर समाजाने आपले नेतेच बनवले. त्यांच्या नेतृत्वाचा जन्मच त्यांच्या विचारांतून झाला होता आणि हे विचार समाजहिताशी जडलेल्या त्यांच्या नात्यातून जन्माला आले होते.

विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री चिपळूणकर या शासकीय नोकरीतील तरुण अध्यापकाने १८७४ साली निबंधमाला हे नियतकालिक सुरू केले व त्यात वाङ्मय, भाषाशुद्धी व देशस्थिती यांच्याबद्दल आपले परखड विचार मांडण्याला सुरुवात केली. निबंधमालेचे एकूण ८४ अंक प्रसिद्ध झाले. चिपळूणकरांनी ब्रिटिश अमदानीत देशाच्या झालेल्या दुरवस्थेचे वर्णन करून त्याबद्दल कडक टीका केली आहे. आमच्या देशाची स्थिती या निबंधमालेच्या शेवटच्या आठ अंकांत प्रसिद्ध झालेल्या निबंधांत ख्रिस्ती मिशनरी, प्रार्थनासमाजासारखे पंथ आणि सामाजिक सुधारणेच्या सुशिक्षितांनी चाललेल्या चळवळी या सर्वांवर उपरोधिक भाषेत कडक टीका केली; त्याचबरोबर समाजाचा आत्मविश्वास जागृत करण्यासाठी त्याच्या अभिमानविषयांचे त्यांनी स्मरणही करून दिले. 'सांप्रत स्थितीत जाळ्यात अडकलेल्या वाघाप्रमाणे जो जो मानभंग होईल, तो तो आमच्या देशास सोसणे भाग आहे. मेकॉलेच्या देशबांधवांची आमच्या काळ्या लोकांवर जशी सहज लीलेने चाबकांची, छत्र्यांची वगैरे कृपा होते, तशीच त्यांच्यासारख्या महापंडितांची आमच्या विद्यादिकांवर होते. हे अनुरूपच आहे...तिच्या झपाट्याने अगदी गतप्राणच न होऊन ज्याच्यात अजून थोडी धुगधुगी उरली असेल त्यास जिवविण्याचा यथाशक्ति यत्न्य करणे आम्हास योग्य वाटते', अशी त्यांची भूमिका आहे. चिपळूणकरांच्या भूमिकेपेक्षा अगदीच वेगळी भूमिका गोपाळ गणेश आगरकरांनी आपल्या लेखनात घेतली आहे. समाजाने आपले आत्मनिरीक्षण करावे व त्याची सुधारणा कशी करावी, याचा विचार करावा, अशी आगरकरांची भूमिका आहे. प्रारंभापासून सुमारे सात वर्षे 'केसरी'त आगरकरांनी संपादक म्हणून लिहिले. नंतर मतभेदामुळे त्यांनी 'सुधारक' हे नियतकालिक काढले. आगरकर देशाच्या स्वातंत्र्याचे कडवे पुरस्कर्ते होते. परंतु त्याचबरोबर त्यांनी 'अज्ञान आणि धर्मभोळ्या लोकांच्या आचरट धर्मकल्पनांतून' समाजाची सुटका करण्याचा प्रयत्न करणे आपले उद्दिष्ट ठरवले होते. दुस-याचे गुलाम न होता स्वतःच्या करामतीवर चरितार्थ संपादण्याची धमक ठेवावी, स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे आपली शक्ती लावावी, असा त्यांनी तरुणांना सल्ला दिला आहे. ज्या सामाजिक रूढींनी स्त्रीवर्गाला अमानुष वागणूक दिली जात होती, त्यांविरुद्ध आगरकरांनी लोकजागृती केली. आगरकरांच्या जिवंतपणीच त्यांची प्रेतयात्रा काढण्यात आली आणि त्यांच्यावर बहिष्कारही टाकण्याची धमकीही देण्यात आली. आगरकरांनी आपल्या लेखनात शेतक-यांच्या आर्थिक स्थितीचाही विचार केलेला आहे. शेतपेढ्या स्थापन कराव्यात अशी त्यांची सूचना आहे. पुरुषांना जे शिक्षण दिले जाते, तेच स्त्रियांना दिले गेले पाहिजे व स्त्रियांनी आपल्याला सोयीचा असेल तसा पोषाख केला पाहिजे, अशा सूचना आगरकर करतात. ग्रहणासारख्या शास्त्रीय घडामोडीला शुभअशुभ मानून अन्नोदकाची शुद्धी करण्याचे अजब उद्योग आणि सोवळेओवळे यांबद्दलही त्यांनी कडक शब्दांत कोरडे ओढले आहेत.

चिपळूणकरांच्या आणि आगरकरांच्या लेखनापेक्षा लोकमान्य टिळकांच्या लेखनाचे स्वरूप वेगळे आहे. टिळकांचे लेखन मुख्यतः 'केसरी'चे संपादक म्हणून झाले आहे. तात्कालिक घटना पुष्कळदा त्या लेखनाला कारणीभूत झाल्या आहेत. त्या घटनेच्या निमित्ताने आपले विचार टिळकांनी मांडले आहेत; मात्र त्यात तात्कालिकता फारच कमी असे व त्यातले विचार सार्वकालिक महत्त्व असलेले असतात. 'हिंदुस्थानातील लोक पाश्चात्त्य विद्येत,

शास्त्रात किंवा कलांत निपुण होऊन त्यांनी सुधारलेल्या राष्ट्रांतील विद्वानांबरोबर, धंदेवाल्यांबरोबर किंवा व्यापा-यांबरोबर आपल्या बुद्धिवैभवाने, करामतीने, कौशल्याने किंवा हिकमतीने टक्कर देण्यास तयार व्हावे, अशी आमच्या सरकारची इच्छा नाही, किंवा इच्छा असल्यास कृती तरी नाही,' असे त्यांनी 'युनिव्हर्सिटया ऊर्फ सरकारी हमालखाने' या अग्रलेखात म्हटले आहे. शासकीय नोकरीसाठी आवश्यक तेवढेच विद्यार्थी कॉलेजात शिकावेत, अशी व्यवस्था आहे याचा निर्देश करून 'नवीन शोध करण्याइतकी बुद्धी अथवा योग्यता आमच्या अंगात नाही असे नाही. ज्या देशात पाणिनी, कणाद, शंकराचार्य, भास्कराचार्य वगैरे विद्वान पूर्वकाली होऊन गेले, त्यात सध्याचे काळी पाश्चर, एडिसन, स्पेन्सर, मिल्ल वगैरे गृहस्थांप्रमाणे विद्वान का निपजू नयेत याचे खरे कारण शोधून काढून याचा प्रतिकार करणे हे प्रत्येक विद्यावृद्धी इच्छिणारांचे कर्तव्य आहे', असे त्यांनी दुस-या अग्रलेखात म्हटले आहे. विद्यापीठांच्या उद्दिष्टांबद्दल त्यांची मते स्पष्ट आहेत. मूलभूत संशोधन हेच विद्यापीठाचे मुख्य कार्य आसले पाहिजे, असे त्यांना वाटते. राष्ट्रीय उत्सवांचा प्रारंभ करून लोकजागृती करणा-या लोकमान्यांनी आपल्या लेखनातही राष्ट्राभिमान जागृत करून अन्यायाविरुद्ध झगडण्याची प्रेरणा दिली आहे.

म. ज्योतिबा गोविंदराव फुले यांनी गुलामगिरी, शेतक-याचा आसूड अशा पुस्तकांद्वारे ब्राह्मण जमातीने सामाजिक व्यवस्थेत मिळवलेले प्राधान्य आणि त्याआधारे इतरांची केलेली पिळवणूक यांबद्दल कडक शब्दांत कोरडे ओढले आहेत. त्याचबरोबर त्यांनी शिक्षणाच्या अभावामुळेच बहुजन समाजाला ही स्थिती प्राप्त झाली हे लक्षात घेऊन शिक्षणप्रसाराचा आग्रह धरला. फुल्यांनी सत्यशोधक समाज हा मूर्तिपूजा व जातिभेद न मानणारा पंथ स्थापन केला होता. त्याचे तत्त्वज्ञान सांगणा-या सार्वजनिक सत्यधर्म या आपल्या पुस्तकात त्यांनी नव्या समाजधर्माची रूपरेखा मांडली आहे व मानवी हक्कांच्या आधारावर नवा समाज कसा होऊ शकेल, हे सांगितले आहे. ते म्हणतात, "स्त्री अथवा पुरुष, जे एकंदर सर्व गावाचे, प्रांताचे, देशाचे व खंडाचे संबंधात अथवा कोणत्याही धर्मातील स्वतःच्या संबंधात, स्त्री आणि पुरुष या उभयतांनी अथवा सर्व स्त्रियांनी अथवा पुरुषांनी, एकमेकांना कोणत्याही प्रकारची आवडनिवड (भेदभाव) न करता या भूखंडावर आपले एक कुटुंब समजून एकमताने एकजुटीने एकमेकांशी सत्य वर्तन करून रहावे."

डॉ. आंबेडकरांनी आपले बहुसंख्य महत्त्वाचे लिखाण इंग्रजीत केले असले तरी बहिष्कृत भारत आणि मूकनायक ही दोन नियतकालिके त्यांनी चालवली. त्यांतील काही लेखन आता पुस्तकरूपानेही उपलब्ध आहे. बहिष्कृत भारताच्या पहिल्याच अंकात बाबासाहेबांनी बहिष्कृतांना त्यांचे हक्क अधिकार म्हणून मिळाले पाहिजेत, कोणाची मेहेरबानी म्हणून नको, असे स्पष्टपणे बजावले आहे. अस्पृश्य समाजाच्या उन्नतीतच सर्व समाजाचे हितही अंतर्भूत आहे, हे त्यांनी मूकनायकाच्या पहिल्या अंकातील आपले मनोगत पुन्हा उद्धृत करून सांगितले आहे. 'कोणतीही एखादी जात अवनत झाली तर तिच्या अवनतीचा चट्टा इतर जातीस बसल्याशिवाय राहणार नाही. समाज ही एक नौकाच आहे व ज्याप्रमाणे आगबोटीत बसून प्रवास करणा-या उतारूने जाणूनबुजून इतरांचे नुकसान करावे म्हणून म्हणा किंवा त्यांची त्रेधा कशी उडते ही गंमत पाहण्यासाठी म्हणा किंवा आपल्या विनाशक स्वभावामुळे म्हणा, जर का इतरांच्या खोलीस छिद्र पाडले तर सर्व बोटींबरोबर त्यालाही जलसमाधी घ्यावीच लागणार आहे.' डॉ. आंबेडकरांनी समाजाच्या मनोभूमिकांची तपासणी स्पष्टपणे करून राजकीय सत्ये वाचकांसमोर मांडली आहेत. 'परस्पर हिंदू जातीत एकमेकांबद्दल इतका गैरविश्वास प्रस्थापित झाला आहे की, परदेशीय राजा असला तर लोक संतुष्ट असतात; पण तोच स्वदेशी नेमण्यास कोणीच कबूल होऊ शकत नाही. कारण राजा स्वदेशीय असला तर त्याला कोणती तरी जात असावयाचीच, इतर जातींना तो परका व अविश्वसनीय वाटावयाचाच. याच भावनेपायी चांगल्या पुढा-याचे पुढारीपण केवळ तो अमक्या जातीचा आहे एवढ्याच कारणामुळे इतर जातींना मान्य होत नाही."

अलीकडील काळात ज्यांनी हिंदू धर्मचिकित्सा केली आणि बुद्धिवादी दृष्टिकोनातून हिंदू धार्मिक तत्त्वज्ञान आणि परंपरा यांची छाननी केली, त्यांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे नाव प्रामुख्याने घेतले पाहिजे.








त्यांनी म्हटले आहे – "निसर्गातील, अत्यंत पवित्र, संपूर्ण मानवी भवितव्याशी संबद्ध जीवन व विश्व अथवा निसर्ग यांची नियंत्रक अशा अलौकिक शक्तींवर (किंवा अशा शक्तींवर) माणसाची श्रद्धा असते; त्या शक्तीचा (वा शक्तींचा) स्वतःशी अनुकूल, पवित्र व घनिष्ठ संबंध स्थापित करणारी वैयक्तिक अथवा सामाजिक मनःप्रवृत्ती व त्यातून निघणारी आचरणाची पद्धती म्हणजे धर्म (Religion) होय आणि त्या शक्तीशी (वा शक्तींशी) प्रतिकूल मनःप्रवृत्ती व आचरण म्हणजे अधर्म होय." दीर्घकाळ परंपरागत पद्धतीने केवलानंद सरस्वतींच्या जवळ प्राचीन हिंदू संहितांचे अध्ययन केलेल्या शास्त्रीबुवांचा आधुनिक तत्त्वज्ञानाचाही मोठा अभ्यास होता. त्यामुळे प्राचीन भारतीय ज्ञानपरंपरेच्या महत्त्वाची जाणीव जशी त्यांना होती, तशीच त्या ज्ञानपरंपरेची तपासणी बुद्धिवादी दृष्टिकोणातून केली पाहिजे, हेही त्यांना मान्य होते. वैदिक संस्कृतीचा इतिहास हे त्यांचे अत्यंत महत्त्वाचे पुस्तक.

हिंदू धर्मतत्त्वज्ञानाचे बुद्धिवादी निकषावर परीक्षण करून प्रचलित काळच्या सामाजिक प्रश्नांचाही विचार करणा-या धर्माभ्यासकांमध्ये विद्वद्रत्न केशव लक्ष्मण दप्तरी यांचाही निर्देश केला पाहिजे. वेद हे ईश्वरप्रेरित नसून माणसांचेच ते बुद्धिकार्य आहे, ते पौरुषेयच आहेत, असा त्यांनी निष्कर्ष काढला आहे. 'दोन स्मृतिवचने एकमेकांच्याविरुद्ध असतील तर त्यांतील जे सद्यःकाळाला आणि विवेकबुद्धीला पटत असेल तेच स्वीकारावे, असा सुधारणेला जवळ जाणारा मार्ग त्यांनी मान्य केला आहे. सोळा वर्षांपूर्वी मुलीचा विवाह करू नये, कारण त्यापूर्वी ती गर्भवती झाल्यास संतती रोगी किंवा अल्पायू होते हे वाग्भटाच्या आधाराने त्यांनी प्रतिपादिले आहे. म. गांधींनी येरवड्याच्या तुरुंगात असताना अस्पृश्यतेबद्दल शास्त्रार्थ करण्यासाठी ज्या पंडितांना पाचारण केले होते, त्यात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याबरोबरच दप्तरींचाही समावेश होता. या शास्त्रीमंडळींतील श्रीधरशास्त्री पाठक यांनी वादविवादासाठी अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी अनुकूल असलेली शास्त्रवचने काढली होती. अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ हे त्यांचे पुस्तक त्याचाच संग्रह आहे.

**राजवाडे**

इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे चौफेर बुद्धिमत्ता, मूलभूत विचार करण्याची शक्ती आणि परखड लेखनपद्धती यामुळे सर्व मराठी विचारवंतांत वेगळेच स्थान असलेले नाव आहे. व्याकरण, भाषाशास्त्र, संस्कृत आणि मराठी वाङ्मय आणि इतिहास अशा विविध विषयांबद्दल राजवाड्यांनी लिहिलेले आहे. त्यांचे सर्वात मोठे काम म्हणजे महाराष्ट्रभर फिरून त्यांनी मराठ्यांच्या इतिहासाची साधने परिश्रमपूर्वक गोळा केली. ऐतिहासिक घटनांचे केवळ निवेदन न करता त्याबद्दल त्यांचे विश्लेषण करणे, त्यांची कारणमीमांसा करणे याला राजवाडे महत्त्व देत. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संस्थापनेत राजवाड्यांचा सहभाग होता व या मंडळाच्या बैठकींत राजवाड्यांनी अनेक निबंध वाचले. मराठीतून विचार मांडले जावेत, असा राजवाड्यांचा आग्रह होता. त्यांनी तत्कालीन महत्त्वाच्या ९६ लेखकांबद्दल माहिती देणारा एक तक्ताच प्रसिद्ध केला आहे. त्यात विचारप्रदर्शनासाठी मराठीचा वापर किती केला गेला, हेही त्यांनी सांगितले आहे. महाराष्ट्राच्या समाजजीवनाची परखड चिकित्सा हा राजवाड्यांच्या लेखनाचा विशेष होता. ज्याला संशोधन करावयाचे आहे त्याने नोकरीच्या फंदात पडू नये, असा त्यांचा सल्ला होता. आपल्या संशोधनाने आणि निर्भीडपणाने अनेक रूढ समजुतींना राजवाड्यांनी धक्का दिला आहे. भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास हे याचे सर्वांत बोलके उदाहरण. महाराष्ट्राचे बौद्धिक जीवन आणि कर्तृत्व हे त्यांच्य जिव्हाळयाचे विषय.

म. गांधीजींचे व्यक्तित्व, त्यांचे तत्त्वज्ञान व त्यांचे नैतिकतेचा आधार घेणारे राजकारण या सर्वांचा प्रभाव महाराष्ट्रात पडणे स्वाभाविक होते. विनोबा भावे आणि दादा धर्माधिकारी हे गांधी-तत्त्वज्ञानाचे मराठीतील महत्त्वाचे भाष्यकार. विनोबांचे सर्वच लेखन आपल्या अधिक परिचयाचे आहे. विशेषतः त्यांचे 'मधुकर' हे पुस्तक ललित अंगाने जीवनाविषयी आपले विचार सांगणारे आहे. गांधीजींची सर्वोदय कल्पना व त्यामागील समतेचा व श्रमप्रतिष्ठेचा विचार अतिशय सोप्या भाषेत दादांनी समजावून सांगितला. ज्या काळात राजकीय कार्यकर्त्यांना बौद्धिके आवश्यक वाटत होती, त्या काळात दादा हेच महाराष्ट्रात गांधीविचारांचे प्रमुख भाष्यकार होते.

ज्यांचा विशेषत्वाने उल्लेख केला पाहिजे ते गांधी-विचारांचे भाष्यकार म्हणजे लोकमान्य टिळक. लोकमान्यांचे राजकारण गांधीजींच्या राजकारणापेक्षा भिन्न होते हे उघड आहे; परंतु खरा बुद्धिवादी माणूस दुस-याच्या मताची छाननी करून त्यातले ग्राह्य जसे स्वीकारतो, तसेच टिळकांचेही झालेले आहे. अवंतिकाबाई गोखले यांच्या म. गांधी चरित्राला टिळकांनी एक प्रस्तावना लिहिली आहे. म. गांधींचे नेतृत्व लोक स्वीकारत आहेत, हे टिळकांनी १९१८ सालीच ओळखले होते व त्याची कारणेही शोधली होती. ते म्हणतात, 'शील किंवा चारित्र्य, ज्यामुळे या कर्ममय भूमीत मनुष्याची सभोवतालच्या वस्तुस्थितीवर सत्ता चालू शकते आणि ज्यामुळे निरनिराळ्या गोष्टींबद्दल केलेल्या प्रयत्नास सिद्धी प्राप्त होण्याचा संभव उत्पन्न होतो, ते शील व चारित्र्य ज्या उदाहरणांवरून आपल्या प्रत्यक्ष निदर्शनास येईल अशी चरित्रे आमच्याकडे फारच कमी दृष्टोत्पत्तीस येतात. गांधींच्या चरित्राचे जे काही वैशिष्ट्य आहे ते हेच होय.' गांधीजींच्या चरित्राचे मर्म त्यांनी ओळखले आहे. "सत्यनिष्ठ आणि न्यायनिष्ठ माणसे कायद्याचा कृत्रिम निर्बंध अशा वेळी पाळणे युक्त नाही असे सांगतात; पण हे सांगणे अमलात येण्यास सत्यावरील व न्यायावरील निष्ठा इतकी तीव्र असावी लागते, की स्वतःच्या किंवा आपल्या बायकामुलांच्या सुखासुखाचा, बलाबलतेचा विचारही मनात न आणता मनुष्य आपले कर्तव्य करण्यास झटदिशी प्रवृत्त होईल. ज्याला मानसिक धैर्य, खरी सत्यनिष्ठा किंवा सात्त्विक शील आणि दानत म्हणतात ते हेच होय. हा गुण केवळ विद्वत्तेने येत नाही, केवळ चांगल्या कुळात उत्पन्न झाल्याने येत नाही आणि केवळ बुद्धिमत्तेनेही येत नाही. खरे आत्मबल हेच होय." असे लोकमान्यांनी गांधींच्या सत्याग्रह मार्गाचे मूल्यमापन केले आहे.

गांधीजींच्या विचारांचा प्रभाव ज्यांच्यावर होता अशा महाराष्ट्रातील विचारवंतांपैकी महत्त्वाचे म्हणजे आचार्य शं. दे. जावडेकर आणि आचार्य स. ज. भागवत. मात्र दोघेही गांधीविचारांचे आंधळे समर्थक नव्हते. भारतीय ज्ञानपरंपरेतील धर्मविचाराची त्यांना चांगली ओळख होती व तिचा ते नव्या संदर्भात विचार करीत होते. आगरकर, टिळक, महात्मा गांधी आणि कार्ल मार्क्स या चौघांना जावडेकरांनी 'धर्ममार्गावरील आपले वाटाडे' असे संबोधले आहे. जावडेकरांची धर्मविषयक समजूत एखाद्या सेंद्रीय संकल्पनेसारखी विकसनशील आहे. प्रथम टिळकांच्या वेदांती विचाराने प्रभावित असलेल्या जावडेकरांना नंतर गांधीजींच्या सत्याग्रह मार्गाचेही महत्त्व पटले. त्याच वेळेला ते फेबियन समाजवाद्यांच्या विचारांचेही चाहते बनले होते. उपनिषदांचे तत्त्वज्ञान हे त्यांना जीवनाचे तात्त्विक अधिष्ठान म्हणून महत्त्वाचे वाटले, तरी स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या तत्त्वत्रयीवर आधारलेली समाजरचना अस्तित्वात आली पाहिजे, असे त्यांना वाटत होते. रशियातील हुकूमशाही पद्धतीच्या राज्यव्यवस्थेचे दोष त्यांना खुपले असणार. त्यातूनच त्यांनी 'सत्याग्रही समाजवादा'च्या तत्त्वज्ञानाची मांडणी केली. लोकशाही पद्धतीने समाजवाद येऊ शकेल; परंतु त्यासाठी गांधीमार्गातील सत्याग्रहासारख्या लोकमत व्यक्त करणा-या अहिंसक आणि नैतिक साधनांच्या उपयोगाची जोड संसदीय लोकशाहीला द्यावी लागेल, असे त्यांना वाटत होते. लोकशाही समाजवाद मानणा-या समाजवादी नेत्या-कार्यकर्त्यांच्या राजकीय कामाकडे जावडेकर आस्थेने पाहत होते. सानेगुरुजींच्या मृत्यूनंतर 'साधने'चे संपादकत्व त्यांनी स्वीकारले होते. या साप्ताहिकाच्या माध्यमातून आणि साहित्य संमेलनासारख्या व्यासपीठावरूनसुद्धा त्यांनी आपले विचार वाचक–श्रोत्यांपर्यंत पोचवले. केवळ निवडणुकीच्या मार्गानेच समाजवाद येईल, असे जावडेकरांना वाटत नव्हते. राजकारणातील अहिंसा वृद्धिंगत करून जनतेचे आत्मबल संघटित करण्याचे काम स्वतंत्रपणे होत राहिले पाहिजे, अशी त्यांना आवश्यकता वाटत होती. सत्तेपासून अलिप्त राहणा-या गांधीविचारांच्या कार्यकर्त्यांचा समाजाचे आत्मबल वाढवण्यासाठी उपयोग होईल आणि राजकारणाल्या सत्शक्तींना आधार मिळेल, अशी त्यांची विचारमांडणी आहे.

आचार्य सखाराम जगन्नाथ भागवत हे एखाद्या मुनीप्रमाणे समाजहिताचा विचार करताकरता आयुष्य घालवलेले महाराष्ट्रातील एक व्यक्तित्व. गांधीविचारांचे








एक प्रवक्ते म्हणून ते ओळखले जात असले, तरी त्यांच्या चिंतनाची मर्यादा तेवढ्यापुरतीच नव्हती. विविध ज्ञानशाखा आणि साहित्य या सर्वांविषयी त्यांना विलक्षण कुतूहल होते व त्याबद्दल ते स्वतंत्र विचार करू शकत. आचार्य जावडेकर आणि आचार्य भागवत इत्यादी गांधीवादी विचारवंतांबद्दल एक फार चांगले निरीक्षण अण्णासाहेब सहस्रबुद्ध्यांनी 'माझी घडण' या त्यांच्या आत्मकथेत नोंदवले आहे. गांधीवाद्यांचे तीन वर्ग करून त्यांनी त्यांतल्या तिस-या वर्गात ते स्वतः, जे. सी. कुमारप्पा, जावडेकर आणि भागवत यांचा समावेश केला आहे. 'आम्ही सारी मंडळी स्थूलमानाने समाजवादी आहोत, आमची मुख्य प्रेरणा समानतेची व न्यायाची आहे, करुणा किंवा धर्माची नाही, साम्यवाद आम्हाला अपुरा वाटतो; पण तो शत्रू नाही, त्याची आमची प्रेरणा एकच आहे. सर्वसामान्य जनतेची क्रूर व भीषण पिळवणूक व सर्वसंहारक दारिद्र्य यांविरुद्ध आमचा लढा आहे. समाजवादाला भारतीय परिस्थितीनुसार वेगळे अनुभवनिष्ठ रूप देण्याचा प्रयत्न आम्ही केला व त्यास गांधीवाद असे आम्ही मानले', असे त्यांनी म्हटले आहे.

आचार्य भागवंताच्या तत्त्वज्ञानाची चांगली ओळख आचार्यांच्या संकलित वाङ्मयाचे संपादक प्रा. अ. के. भागवतांनी त्या संग्रहाला लिहिलेल्या आपल्या प्रस्तावनेत करून दिली आहे. त्यांची अध्यात्मकल्पना इहवादी होती व राजकारणासारख्या लौकिक जीवनअंगापासून दूर राहण्याची गरज नाही, अशी त्यांची कल्पना होती. संस्कृतीचा अहंकार हा महाराष्ट्राचा शाप आहे, असे त्यांना वाटे. चातुर्वर्ण्य संकल्पनेतील विषमतेने संतांचे अध्यात्म डागाळले असल्याची व्यथा त्यांनी व्यक्त केली आहे. महाराष्ट्राने नवी सत्याग्रहनीती, समतेवर आधारलेली समाजव्यवस्था व निर्वैर अशी सर्वांवर प्रेम करणारी राजनीती अवलंबावी, असे आग्रहाने प्रतिपादन केले आहे. भागवत ललित साहित्याचेही चिकित्सक व मर्मग्राही अभ्यासक होते. बा. सी. मर्ढेकरांवर अश्लीलतेचा खटला झाला, त्या वेळी मर्ढेकरांच्या कवितेत काही अश्लील नाही, असे सांगण्यासाठी त्यांनी न्यायालयात साक्ष दिली. समाजाविषयीच्या आस्थेमुळे वैचारिक साहित्य जन्माला येते तसेच ते विचारांच्या विश्वात पडणा-या नव्यानव्या भरीने होणा-या आनंदामुळेसुद्धा. आचार्य स. ज. भागवत हे महाराष्ट्रातले एक महत्त्वाचे विचारवंत. वि. रा. करंदीकरांनी त्यांचे एक अतिशय सुंदर व्यक्तीचित्र लिहिले आहे. त्यात त्यांनी हे वैशिष्ट्य सांगितले आहे– 'वरवर पहाता आचार्य आपणा सर्वांच्याबरोबर व्यवहारात वावरत असले, तरी विचारांचे जग हेच त्यांचे खरेखुरे जग होते. कोणत्याही विषयाबद्दल एखादा नवा विचार कोणी मांडलेला आढळला, की त्यांचे मन तिकडे आकृष्ट होत असे. आचार्यांच्या या विचारविश्वाला देशकालाची बंधने तर नव्हतीच; पण विशिष्ट विचारप्रणालीची झापडेही उरलेली नव्हती. कोणत्याही विषयामध्ये मानवी बुद्धीने केलेला मुक्त संचार पाहताना आचार्यांचे मन निखळ आनंदात बुडून जात असे.'

जावडेकर, भागवत, दादा धर्माधिकारी किंवा रेगे हे विचारवंत समाजाला व समाजातील परिवर्तन घडवून आणू इच्छिणा-या शक्तींना बरोबर घेऊन आपली वैचारिक वाटचाल करत होते. त्या अर्थाने त्यांचे लोकमान्य टिळक किंवा बाबासाहेब आंबेडकरांशी नाते आहे. जेव्हा राजकारणातल्या किंवा समाजकारणातल्या शक्तींना नव्याने विचार करून पुढे जाण्याची इच्छा होती, त्या वेळेला या विचारवंतांनी त्यांना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष मार्गदर्शन केले आहे. विनोबांच्या भूदान, ग्रामदानासारख्या विचारांच्या मागे कार्यकर्ते मोठ्या संख्येने उभे राहिले.

स्वातंत्र्योत्तर काळात ज्यांच्या मार्गदर्शनाने महाराष्ट्रातील राजकीय व सामाजिक क्षेत्रांत काम करणा-या कार्यकर्त्यांना वैचारिक आधार मिळाला, त्यांत मेघश्याम पुंडलिक रेगे हे एक वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तित्त्व होते. रेगे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. पा चात्त्य तत्त्वज्ञांच्या विचारांचा मराठी वाचकांना परिचय करून देणारे ते सर्वांत मोठे भाष्यकार. असे असूनही भारतीय ज्ञानपरंपरेशी आपले नाते कायम असले तरच भारतीय समाजासाठी आपल्याला नवा विचार करता-सांगता येईल, असे ते मानत. रेगे विचार मांडत आणि त्याचबरोबर नवी समाजरचना करू पाहणा-या तरुण कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करत. त्यांनी दीर्घकाळ पुरोगामी युवकांच्या चळवळींना मदत केली. समाजप्रबोधन संस्थेच्या वतीने विद्यार्थ्यांची शिबिरे घेतली. युवक क्रांती दल, दलित पँथर अशा

बंडखोर परिवर्तनवादी चळवळींमधील काही कार्यकर्ते आणि नेते यांच्याशी त्या चळवळींच्या प्रारंभकाळात रेग्यांचा सल्लागार आणि मार्गदर्शक म्हणून संबंध होता. पुढच्या काळात वैचारिक कट्टरता वाढली आणि नव्या राजकीय वातावरणात हा संबंध उरला नाही. हमीद दलवाई यांच्या मुस्लीम सत्यशोधक समाजालाही रेग्यांचे सहकार्य लाभले होते.

ज्यांनी कठोरपणे सामाजिक वास्तवाची चिकित्सा केली आणि आपली मते स्पष्टपणे मांडली, त्यांतील महात्मा फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा उल्लेख वर आलाच आहे. हिंदुसंघटनेचा पुरस्कार करणा-या स्वातंत्र्यवीर सावरकरांनी वैज्ञानिक दृष्टीने सामाजिक प्रथांची फेरतपासणी करण्याची आवश्यकता प्रतिपादन करणारे जे 'विज्ञाननिष्ठ निबंध' लिहिले आहेत आणि समाजातील अस्पृश्यतेसारख्या अमानुष रूढींचा जो धिक्कार केला आहे, तो मराठीतील वैचारिक वाङ्मयाचा एक महत्त्वाचा भाग आहे. स्वा. सावरकर सामाजिक बाबतीत अतिशय कठोर बुद्धिवादी आहेत. गाय हा एक उपयुक्त पशू आहे व अंधश्रद्धांच्या आहारी जाऊन अव्यवहार्य निर्णय आपण घेऊ नयेत, असे सावरकरांचे प्रतिपादन आहे. *किर्लोस्कर* मासिकात सावरकरांचे बुद्धिनिष्ठ निबंध प्रसिद्ध झालेले आहेत. गोरक्षण हा अज्ञानयुगाचा एक उत्कृष्ट अस्थिशेष आहे, असे स्पष्टपणे लिहिणा-या सावरकरांनी जातिभेदाचे कंबरडे मोडण्यासाठी सहभोजने आणि रोटीबंदी झुगारून देणे या उपायांना पाठिंबा दर्शविला आहे. महाराष्ट्रातील जातिवास्तवाबद्दल तितक्याच कठोरपणे लिहिणारे आणखी एक विचारवंत म्हणजे प्रबोधनकार केशवराव ठाकरे. त्यांच्या 'कोदंडाच्या टणत्काराने' महाराष्ट्रात बरीच खळबळ माजवली होती. ब्राह्मणेतर चळवळीतील *जागृती*कार भगवंतराव पाळेकर, *विजयी मराठा*कार श्रीपतराव शिंदे, *दीनमित्र*कार मुकुंदराव पाटील, जवळकर आदींनी आपल्या नियतकालिकांमध्ये आणि इतरत्र जातिवर्चस्वाविरुद्ध लिहिले आहे. मुस्लीम मानसिकतेची डोळस चिकित्सा करणारे नरहर कुरुंदकर, मुस्लिमांना वेगळे काढून त्यांच्यातील अलगतेच्या भावनेला खतपाणी घालण्याचे ब्रिटिशांनी अवलंबिलेले धोरणच काँग्रेस पुढे कसे चालवत आहे हे सांगणारे हमीद दलवाई आणि अर्वाचीन, राजकीय व सामाजिक इतिहासाचे विश्लेषण करणारे वसंत पळशीकर आदींच्या लेखनानेही मराठी वैचारिक वाङ्मयात भर घातली आहे. यांशिवायही अनेक लेखकांचे व त्यांच्या लेखनाचे योगदान त्यात आहे. वर सांगितल्याप्रमाणे मराठीतील सर्वच वैचारिक वाङ्मयाचा आढावा घेणे अगर त्याच्या गुणवत्तेची चर्चा करणे हा या लेखाचा उद्देश नाही. अलीकडील काळात वैचारिक वाङ्मय का कमी लिहिले जात आहे, हा प्रश्न विचारार्थ उपस्थित करणे हाच या लेखाचा उद्देश आहे.

वैचारिकता फक्त निबंधात्मक गद्यलेखनातच असते, असे नाही. काहीवेळा ती ललित वाङ्मयातसुद्धा प्रगट होते. ललित लेखकसुद्धा देशाबद्दल, समाजाबद्दल विचार करतच असतो. अनेक चांगल्या ललितकृती लेखकांच्या विचारविश्वातून जन्माला आलेल्या असतात. वैचारिकता ही अशा ललित लेखनाची एक अंगभूत गोष्ट असते. विचारांच्या प्रतिपादनासाठी बाह्यवरण म्हणून एखाद्या वाङ्मयप्रकाराची निवड केलेली नसते. केशवसुतांची नवा शिपाई ही कविता या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. 'ब्राह्मण नाही, हिंदुही नाही न मी एक पंथाचा; तेच पतित की जे आखडती प्रदेश साकल्याचा.' ही कवीच्या मनातील विश्वबंधुत्वाची भावना या कवितेचा आत्मा आहे. दुसरे उदाहरण श्रीधर व्यंकटेश केतकरांच्या कादंबरीचे घेता येईल. या कादंब-यांच्या कथावस्तुच केतकरांच्या समाजविश्लेषणातून जन्माला आल्या आहेत. म्हणूनच दुर्गाबाई भागवतांनी त्यांना सामाजिक विचारकथा असे म्हटले आहे. वामन मल्हार जोशींच्या 'सुशिलेचा देव'सारख्या कादंब-यांचा याच गटात समावेश केला पाहिजे. श्रीधर व्यंकटेश केतकर, इरावतीबाई कर्वे, दुर्गा भागवत अशा काही लेखकांनी मराठी समाजजीवनाची केलेली चिकित्सा अनेकदा ललित साहित्यकृतींचे रूप घेऊन जन्माला आली आहे.

आज मराठीतील ही वैचारिक साहित्याची परंपरा खंडित झाल्यासारखी दिसते. लोकशाहीचे जे स्वरूप प्रत्यक्षात आज झाले आहे, त्यात विचारवंत हा नेता

बनण्याची अजिबात शक्यता उरलेली नाही. विचारवंताला कसलीच अभिलाषा नसते. अगदी समाजाचे आपण पुढारी व्हावे, अशीसुद्धा नसते. त्यामुळे नेतृत्वाचा प्रश्न बाजूला ठेवू. पण आपण आज समाजाबद्दल काही स्वतंत्र विचार करावा व आजच्या परिस्थितीत तो लोकांना पटण्यासाठी उशीर लागला, तरी तो मांडावा अशी प्रेरणाही लेखकांना होत नाही, असे का? लेखक आणि समाज यांचे वैचारिक लेखनापाठीमागे असलेले नातेच आता संपुष्टात आल्यासारखे दिसते आहे. ही फार गंभीर गोष्ट आहे.

मराठीतील वैचारिक वाङ्मयाची परंपरा खंडित का झाली आहे, याची कारणमीमांसा काही अभ्यासकांनी आणि विचारवंतांनीही केली आहे. मेघश्याम पुंडलिक रेगे यांनी महाराष्ट्र फाउंडेशनचा जीवनगौरव पुरस्कार स्वीकारताना केलेल्या भाषणात काही कारणे सुचवली आहेत. विचार सांगणा-या विचारवंतांनी त्या विचारांच्या मागच्या तत्त्वज्ञानाची नीट फेरमांडणी केली नाही व न्या. रानडे आणि लो. टिळकांचा अपवाद वगळता तत्त्वज्ञानाच्या पातळीवरचे लेखन कोणी केले नाही, हे परंपरा खंडित होण्याचे एक कारण आहे, असे रेग्यांना वाटते. त्यांनी म्हटले आहे, "वैचारिक साहित्याची परंपरा आपल्याकडे निर्माण झालीच नाही, असे नाही....विष्णुबुवा ब्रह्मचारी, लोकहितवादी, ज्योतिबा फुले, रानडे, आगरकर, टिळक, आंबेडकर हे सर्व विचारवंत त्या काळात महाराष्ट्रापुढचे जे प्रश्न होते– सामाजिक, काही प्रमाणात आर्थिक, राजकीय- त्यांच्याविषयीचं आपलं चिंतन लेखन समाजाला जागृत करण्यासाठी करीत. त्यानंतर असं नाव आपण घेऊ शकत नाही.... आता यांना कोणी घडवलं होतं? पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाने जी आधुनिक स्वरूपाच्या समाजाची पायाभरणी केली, अनुभववाद, वैचारिक विचारपद्धती यांचा तसेच स्वातंत्र्य, समता, बंधुता या प्रबोधनाच्या मूल्यांचा आविष्कार कोणत्या प्रकारच्या जीवनात होईल, याचा विचार करून त्या पार्श्वभूमीवर ही वैचारिक परंपरा महाराष्ट्रात विकसित झाली. पुढे गांधीवाद, मार्क्सवाद यांसारखे अत्यंत प्रभावी असे वैचारिक संप्रदाय विकसित झाले; पण मराठीमध्ये त्यांचं प्रतिबिंब पडलं आहे असं आपल्याला दिसत नाही. हे का झाल असावं? मला याच कारण असं वाटतं की, या प्रकारच्या विचाराला जे पायाभूत तत्त्वज्ञान होतं त्याची आपण हेळसांड केली. फिलॉसॉफिकल म्हणता येईल त्या पातळीवरचं-दार्शनिक पातळीवरचं लिखाण न्या. रानड्यांत आणि लोकमान्य टिळकांत आढळेल. आगरकरांनीही सुधारणांचा प्रचार केला; पण त्याच्या सैद्धांतिक पायाचे व्यवस्थित विवरण केले नाही."

भारतीय दर्शनांचा व शास्त्रांचा जो वैचारिक वारसा आहे, त्याकडे आपण पाश्चात्त्य प्रभावामुळे जाणूनबुजून दुर्लक्ष केले. ही भारतीय ज्ञानपरंपरा प्रतिगामी आहे, असा शिक्का आम्ही मारला. याच संस्कृतीने आपल्या विचारक्षमतेचे पोषण केले आहे, हे आपण विसरून गेलो. पाश्चात्त्य विचारपरंपरांवर आमच्या स्वतंत्र विचारांचे कलम आपण करू शकलो नाही, कारण ते अस्वाभाविक होते, असे रेग्यांनी निदान केले आहे. कोणताही परकीय विचार लक्षात घेताना आपली ज्ञानपरंपरा पूर्णपणे नाकारणे वा दृष्टिआड करणे अयोग्य आहे, असे रेग्यांचे मत आहे. आपल्या वारशाचे चिकित्सक परीक्षण करून, तारतम्य बाळगून त्यातले ग्राह्य फक्त स्वीकारून त्या परंपरेवरची आपली पकड मजबूत करणे हा कार्यक्रम ज्यांना महाराष्ट्रातील वैचारिक साहित्याविषयी आस्था आहे, त्यांनी हाती घेतला पाहिजे, असे रेग्यांनी सुचवले आहे.

प्रा. के. रं. शिरवाडकर यांनी आपले विचारविश्व या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत महाराष्ट्रातील विचारवंतांची परंपरा खंडित होण्याची कारणे शोधली आहेत. त्यांनी म्हटले आहे, "महाराष्ट्रात टिळक, राजवाडे यांच्यासारख्या श्रेष्ठ विचारवंतांची परंपरा नाहीशी का झाली, हे एक कोडेच आहे. आज या परंपरेला शोभणारे आणि परिस्थितीला अनुरूप असे प्रगल्भ विचार देणा-यांची किती नावे घेता येतील?" हा प्रश्न सविस्तर संशोधनाचा आहे आणि त्याची अनेक कारणे असू शकतील, असे नमूद करून त्यांनी त्यांतले सहज जाणवणारे एक कारण सांगितले आहे. "महाराष्ट्रातील शिक्षण संस्थांना– विशेषतः महाविद्यालय आणि विद्यापीठे यांना– आपली जबाबदारी पेलता आली नाही. १९५० नंतर जागतिक ज्ञान ज्या गतीने पुढे जात होते, त्याचा महाराष्ट्रातील उच्च

शिक्षणक्षेत्रास पत्ताही नव्हता. इतरांविषयी तुच्छता, आत्मतुष्टी आणि संकुचित दृष्टी यांनी उच्चशिक्षण ग्रासले गेले. परिणामी मराठी विद्यार्थी म्हणजेच मराठी मन सामान्य गुणवत्तेकडे ढकलले जात होते. त्यात पुन्हा इंग्रजीतला कच्चेपणा! त्यामुळे सामान्यतेचे संपादन (Achievement of mediocrity) हे महाराष्ट्रातील उच्चशिक्षणाचे उद्दिष्ट बनले. जीवनाच्या प्रगतीची प्रेरणाशक्ती म्हणजे त्या समाजाच्या विचारांची गुणवत्ता. विचारांची परंपरा क्षीण झाल्यानंतर महाराष्ट्रावर अवनतीची छाया पसरणे अटळ होते. जागतिकीकरणाची प्रक्रिया नुसतीच बाजाराची नाही", असे शिरवाडकरांनी म्हटले आहे.

अलीकडील काळात, विशेषतः स्वातंत्र्योत्तर काळात, मराठीत वैचारिक वाङ्मय फारसे का लिहिले गेले नाही, याची जी कारणे रेगे आणि शिरवाडकर देतात, त्यांत तथ्य आहे हे उघड आहे. भारतीय ज्ञानपरंपरेशी आपले नाते तुटले व ग्राह्याग्राह्याचा विवेक न करता आपण आपला सगळाच ज्ञानठेवा नाकारला आणि पाश्चात्त्य विचार प्रमाण मानून, स्वीकारून त्याच्या आधाराने फक्त विचार करण्याचा प्रयत्न केला, यामुळे आपली स्वतंत्र विचारक्षमता बाधित झाली, असा निष्कर्ष रेग्यांनी काढला आहे. युरोपात झालेला विचार, तो परकीय आहे म्हणून टाकून देण्याची गरज नसते; पण तोच एक लक्षात घेण्यासारखा आहे, असे मानले तर स्वतंत्र व नव्याने विचार करण्याची गरजच भासणार नाही; असेच थोडेफार आपल्याकडील विचार करू शकणा-या उच्चशिक्षितांचे झाले आहे. भारतातील विद्यापीठांचा शैक्षणिक दर्जा झपाट्याने घसरतो आहे. काही अपवाद वगळले तर विज्ञान आणि मानव्यशास्त्र या दोन्हींमध्ये मूलभूत आणि स्वतंत्र विचार विद्यापीठात जन्म पावला, असे दिसत नाही. सवंग लोकप्रियतेची कास धरण्यासाठी दर्जाला पातळ करून सामान्यतेवरच पाठ थोपटून घेतली जाते, हे प्रा. शिरवाडकरांनी सांगितले ते खरे आहे. अपवाद असतील आणि आहेतही; पण अपवादांची संख्या थोडीच असते.

वैचारिक वाङ्मयाच्या दुर्मिळतेचे आणखी एक कारण मला दिसते. पूर्वी सांगितल्याप्रमाणे वैचारिक वाङ्मय हे एकूण समाजस्थितीचा किंवा त्यातील एखाद्या विभागातील स्थितीचा आस्थेने विचार करून त्याबद्दल लिहिले गेले. या सर्व लेखकांचे – मग ते लोकहितवादी, रानडे, टिळक, आगरकर, फुले, आंबेडकर कोणीही असो– समाजाशी एक घट्ट नाते होते, समाजाविषयी आत्मीयता होती. आपले जीवन आणि हितसंबंध समाजापेक्षा वेगळे नाहीत., या समाजाचाच ते भाग आहेत, याची त्यांना जाणीव होती. त्यांच्या या जाणिवेतूनच त्यांनी हे लेखन केले आहे. आज सुशिक्षितांची संख्या खूप वाढली आहे, मध्यमवर्ग खूपच विस्तारला आहे पण या मध्यमवर्गातील प्रत्येक व्यक्तीचे एकूण समाजाशी असलेले नातेच संपुष्टात आहे आहे किंवा ते ठिसूळ तरी झाले आहे. याची दोन कारणे असावीत– एकतर पूर्वीच्या जीवनपद्धतीत (विशेषतः खेड्यात आणि छोट्या शहरात) सर्वच माणसे कमीअधिक प्रमाणात एकमेकांवर अवलंबून असत आणि सर्व समाजघटकही तसेच परस्परसहकार्यावर अवलंबून असत. ते समाजजीवन आता खूपच बदलते आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्रपणे इतर घटकांची पर्वा न करता जगता येण्याची शक्यता निर्माण झालेली आहे.

आणखी एक कारण आहे. पूर्वीही समाजात जाती होत्या. त्यांचे कधी संघर्षही होत. पण तरीही त्यांच्यात एकमेकांशी असलेल्या नात्याचा धागा टिकून असे. राजकीय फायद्यासाठी जातिजातींतील भिंती मजबूत करण्याचा आणि एकमेकांविषयीची कटुता वाढवण्याचा प्रयत्न आज होतो आहे. या दोन्ही गोष्टींचा एकत्र परिणाम म्हणजे व्यक्तीचे समाजाशी असलेले नातेच हळूहळू विरून जाऊ लागले आहे. अशा परिस्थितीत आपल्यापुरतेच, आपल्या कुटुंबापुरते आपण पाहू, समाजाची उठाठेव कशाला, अशीही वृत्ती वाढीस लागली आहे. सर्व समाजघटकांच्या एकत्रित हिताचा विचार आपण कशासाठी करावयाचा, असा प्रश्न जाणत्या सुशिक्षितांना पडला असण्याचा संभव आहे.

वैचारिक साहित्याची निर्मिती त्या मताचा, सल्ल्याचा, सत्यदर्शनाचा वाचकांनी विचार करावा यासाठी होत असते. त्याचे स्वरूप सामान्यतः आदेशवजा नसते. लेखक वाचकांना आपला सहविचारक मानतो. त्यांना विश्वासात घेऊन आपले विचार त्यांच्यासमोर मांडतो व

अनुक्रमणिका

त्यांनाही विचार करण्याचे आवाहन करतो. म्हणून एखाद्या हुकूमशाही वृत्तीच्या नेत्याचे किंवा धर्मगुरूचे प्रवचन जसे श्रद्धेने ऐकून त्याचा विचार न करता ते ग्राह्य मानले जाते, तसे वैचारिक साहित्याबद्दल होत नाही. विचार हा विचारांनीच तपासून स्वीकारला गेला पाहिजे, अंधश्रद्धेने नव्हे! लेखक आणि वाचक यांची ही सहभागाची प्रक्रिया आहे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे जेव्हा वातावरणात उदारता असते, त्याच वेळी नवा विचार जन्माला येऊ शकतो. लेखकाला समाजाची स्थिती जाणून घेण्याचे स्वातंत्र्य पाहिजे, त्याबद्दल स्वतंत्रपणे विचार करण्याची मुभा पाहिजे आणि त्याला आपला विचार मोकळेपणाने मांडण्याचे स्वातंत्र्य पाहिजे. म्हणून जेथे उदारमतवादी लोकशाही ख-या अर्थाने अस्तित्वात आहे व शासन किंवा झुंडशाहीची दडपणे अस्तित्वात नाहीत, तेथेच विचारांचा खराखुरा संवाद होऊ शकतो, वैचारिक साहित्य जन्माला येऊ शकते. आज बहुतेक गटांचा स्वतःच्या विचारांबद्दलचा आग्रह इतक्या टोकाला गेला आहे, की विचारस्वातंत्र्याच्या रक्षणासाठी लढा देण्याची घोषणा करणारेसुद्धा दुस-याचे विचार ऐकायला तितकेसे उत्सुक नसतात, असे काही वेळा दिसते. एकांतिक भूमिका आणि प्रतिपादनातील कर्कशता आणि एकमेकांच्या हेतूबद्दलचे खरेखोटे पूर्वग्रह यांमुळे वातावरणातला संवाद जवळजवळ संपुष्टात आला आहे. समाजातील संवादासाठी लागणारे मोकळेपण आणि निर्भयता कदाचित कमी झाली असावी, आकसली असावी. दुस-याचा विचार ऐकण्याची क्षमता कमी झाली असावी, हेही एक कारण वैचारिक साहित्य कमी लिहिले जाण्याला कारणीभूत झाले असावे.

स्वातंत्र्यपूर्व काळात प्रसिद्ध होणारे वैचारिक लेखन मुख्यतः दोन प्रकारचे होते, याचा उल्लेख वर केला आहेच. त्यातील स्वातंत्र्याची प्रेरणा देणा-या लिखाणाला शासकीय निर्बंधांचा अडथळा होता व तो समोर ठेवून किंवा झुगारून देऊन लिहावे लागे. सामाजिक व्यंगांबद्दल कडक टीका केलेली प्रस्थापितांना सहन होत नसे. समाजसुधारणेविरुद्धचे वर्ग त्याबद्दल लेखकाला धारेवर धरत. स्वातंत्र्यानंतर ही दोन्ही बंधने शिथिल झाली. आज स्वातंत्र्याचा पुरस्कार करणे अगर सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणे याला फारसा विरोध होण्याचे कारण नाही. सरकार अशाबद्दल सामान्यतः हस्तक्षेप करतही नाही. तरीही आज अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य पूर्णपणे अस्तित्वात आहे, असे म्हणणे कठीण आहे. राजकीय आणि सामाजिक बाबतीत काही मंडळींच्या भूमिका अगदी टोकाच्या, अपरिवर्तनीय आणि कर्कश झाल्या आहेत. आपल्या भूमिकेविरुद्ध किंवा त्या भूमिकेपासून थोडेसे वेगळे असलेले विचार कोणी मांडलेले त्यांना अजिबात सहन होत नाही. समाजातील वेगवेगळ्या व्यक्तींचे वेगवेगळे विचार असू शकतात व त्या सर्वांना तसे विचार मांडण्याचा अधिकार आहे, हे घटनेतील तत्त्व मनोमन त्यांना मान्यच नसते. त्यांतले काही तर आम्ही घटनेचा आदर करतो, ती आम्हाला वंदनीय आहे, असेही सांगत असतात. प्रत्यक्षात त्यांचे वर्तन मात्र त्याविरुद्ध असते.

ही जी वैचारिक असहिष्णुता आज दिसते आहे, ती विचारवंतांच्या स्वतंत्र मतप्रतिपादनाला जन्मकाळीच खुडू पाहणारी प्रवृत्ती आहे. हे एखाद्या विशिष्ट मतप्रणालीचे लोकच वाढवताहेत, असे नाही. सर्वच विचारांच्या मंडळींनी यात आपापली भर टाकली आहे. लोकशाहीचा आधार असलेला जो उदामतवाद, त्याची आपण फारकतच घेतली आहे. निवडणुका या ना त्या मार्गाने जिंकून लोकशाही व्यवस्थेचा सांगाडा आपल्या हुकूमशाही उद्दिष्टांना साध्य करण्यासाठी वापरावयाचा, अशी ती कार्यपद्धती आहे. म्हणूनच न्यायालयांचे निर्णय धाब्यावर बसवले जातात. सेन्सॉर बोर्डाने मान्य केलेले चित्रपट किंवा नाटके दाखवू दिली जात नाहीत. वेगळे मत व्यक्त करणा-यांच्या घरावर दगडफेक होते. जे आपल्याविरुद्ध बोलतात त्यांच्या हेतूबद्दलच शंका व्यक्त करून एकतर त्यांना राष्ट्रद्रोही किंवा प्रतिगामी असे काहीतरी ठरवले जाते. हे वातावरण देशातील प्रश्नांबद्दल स्वतंत्र विचार व्यक्त होण्याला खासच पोषक नाही.

समाजस्थितीचा विचार करीत त्यातले दोष दाखवत त्याबद्दल निर्भीडपणे आपली मते मांडावयाची हे जर विचारवंतांचे कार्य मानले, तर त्यांचे विचार आणि लेखन हे सद्यःकालीन परिस्थितीबाबत असले पाहिजे. गतकाळातील अन्यायविषयी बोलणे सोपे असते;

वर्तमानातील अन्यायाबद्दल बोलणे जोखमीचे असते. गोर्बाचेव यांनी रशियात जेव्हा परिवर्तन घडवून आणले, त्या वेळी आजवर जे कम्युनिस्ट राजवटीत शक्य नव्हते ते समकालीन समीक्षण यानंतर होऊ शकेल, असे त्यांनी सांगितले. वर्तमानातील अन्यायाबद्दल बोलणे अवघड असते, कारण अन्याय करणारे बलवान असतात व त्यांना आपल्यावरची टीका आवडत नसते. हे केवळ राजकारणात असते असे नाही, तर ते जीवनाच्या सर्व क्षेत्रांत असते. आज समाजात घुसलेल्या अपप्रवृत्ती, जीवनाच्या सर्वच अंगांमध्ये हुकूमशाही आणि झुंडशाही यांचा वाढत चालणारा प्रभाव यांविषयी विचार करणे आणि तो निर्भयपणे मांडणे हे आजच्या विचारवंतांचे काम आहे. ते करताना विचारवंतांना आपल्या विचारांची किंमतसुद्धा द्यावी लागते. त्यासाठी जो तयार असतो, तोच खरा विचारवंत.





अनुक्रमणिका








# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक - ४

श्री. के. वनपाल

आमच्या महसूल खात्याचं नाव खरे पाहता 'कमी तिथं आम्ही' असं ठेवायला हवं होतं, किंवा हवं. दुष्काळ, पूर परिस्थिती, धान्य पुरवठा, 'धान्य लेव्ही' जबरदस्तीने गोळा करणे, बचत योजना, निवडणुका, एक ना दोन शेकडो योजना आम्ही सरकार सांगेल त्याप्रमाणे राबवायच्या! मुळात शेतजमिनीचा सारा गोळा करणे आणि त्यासंबंधीचे शेतक-यांचे ७/१२ उतारे अद्ययावत ठेवणे हे आमचे काम. पण सरकारचा महसूल खात्यावर (मुख्यतः कलेक्टरवर) जबरदस्त विश्वास. ही संस्था धोका देणार नाही; योग्य ते काम करील, अहवाल देईल व त्या आधाराने परिस्थितीला तोंड देता येईल, हा सरकारचा आमच्यावरचा विश्वास! याच कामात एकदा एक विचित्र घटना अनुभवायला मिळाली.

(१)

ज्वारीची लेव्ही गोळा करण्याचे दिवस होते. मी तलाठ्यांची आणि प्रत्येक गावातल्या कोतवालांची एक संयुक्त सभा आयोजित केली. एकूण गावे १२० म्हणजे १२० कोतवाल आणि ६२ तलाठी. तलाठ्यांना वाटले, काय हे रावसाहेबांचं नवं खुळ! खुप मोठी सभा झाली. मी प्रस्ताव मांडला, की कोतवालांच्या साहाय्याने तलाठ्यांनी 'लागूपुरता' (हा रेव्हिन्युचा शब्द) नकाशा तयार करावा. सहसा मातब्बर शेतकरी पेवात ज्वारी भरून ठेवतात व लागेल तशी वापरून उरलेल्या ज्वारीला भाव आल्यावर विक्रीला काढतात. या पेवांचा नकाशा व त्यावर कुणाची किती ज्वारी आहे याची नोंद असली म्हणजे गावात गेल्याबरोबर झटकन पेवं उघडण्याचा कार्यक्रम हाती घेता येईल आणि लेव्ही योजना तडीस नेता येईल. सगळं व्यवस्थित समजावून सांगितल्यावर तलाठी आणि कोतवालांनी आठवड्याभरात हे नकाशे माझ्या कचेरीत पोचवण्याची हमी दिली. सभा संपली. अर्थात तलाठ्यांनीही नकाशाची एक प्रत त्यांच्यापाशी ठेवावी, ही सूचना मी न विसरता दिली.

झालं. आठ दिवसांनी आमच्या कचेरीतल्या अव्वल कारकुनांना, सर्कल ऑफिसर, सर्कल इन्स्पेक्टरांना विभाग वाटून देऊन ते नकाशे दिले आणि लेव्ही गोळा करण्याचे काम सुरू झाले. मीही एखाद्या गावाला जाऊन हे काम करीत बसायचो. माझी अडचण म्हणजे सगळं गाव कानडी बोलणारं! तलाठ्याच्या साहाय्यानं शेतक-यांशी बोलावं लागायचं. पण ते कधी विपरीत व्हायचं. म्हणून काही प्रश्न कसे विचारायचे हे मी तलाठ्यांकडून शिकून घेतलं. "ईस्ट चिला अदं?" म्हणजे "किती पोती ज्वारी झाली?" "मन्नागं इस्टु चिला?" म्हणजे "घरात किती पोर्ती?" "हत्यारगं इस्टु चिला?" म्हणजे "बळदात किंवा पेवात किती पोती?" माझं त्यातलं व्याकरण, उच्चार, सगळचं विचित्र. पण हे ज्ञान थोडं कामी यायचं. शेतक-यांना मी जवळचा आहे, असं वाटायचं. बिचारे शेतकरी अगोदरच भ्यालेले असायचे. सैदप्पाचा पावशेर पितळी बिल्लासुद्धा त्यांना भीती दाखवून जायचा. मनमोकळेपणाने आणि विश्वासाने त्यांच्याकडची ज्वारी द्यायला ते तयार व्हायचे. ठरल्याप्रमाणे ज्याची त्यानं ज्वारी दिली की नाही, याचा पडताळा मी नंतर घ्यायचो.

पण एकदा मजा झाली. कुण्या शहाण्याने प्रांत ऑफिसरला एक निनावी पत्र पाठवले. त्यात लिहिलं होतं, की हन्नूर गावच्या सरपंचाची खूप ज्वारी आहे आणि त्याने ती देवळापुढच्या पेवात दडपून ठेवली आहे; आणि किती ज्वारी झाली हे सांगणारे निवेदनही त्याने तलाठ्याला दिलेलं नाही.

माझ्याच वयाचे, प्रोबेशन संपवलेले प्रांत ऑफिसर! आपल्या हाती जबरदस्त माहिती आली आहे आणि तहसिलदाराला याची माहिती नाही असा विचार करून, मला काही न सांगता पोलिस खात्यातल्या त्यांच्या एका मित्राला घेऊन गाडीतून परस्पर त्या गावाला गेले. मला काहीच कल्पना नव्हती. पण प्रांत ऑफिसमधल्या शिरस्तेदाराला राहवलं नाही. त्याने मला फोन करून या

गोष्टीची कल्पना दिली. आता प्रांतसाहेबानं हा उपद्व्याप कशाला केला असं माझ्या मनात आलं! पण वरिष्ठांची मर्जी. मी विश्वासातल्या अव्वल कारकुनाला बोलावून हे सांगितलं. असा विचार झाला, की आपण त्या गावी जावं आणि ज्वारी कशी गोळा करतो, ते दाखवावं.

मी पी. एस. आय. ना बोलावून घेतलं आणि सांगितलं, की "एक ट्रक ठरवा. त्यात दोन-चार मजूर घ्या. पोलिस कॉन्स्टेबल बंदुकीसह घ्या. एक बादली, दोर, एक कंदील, गूळ असं सगळं बरोबर घ्या. अर्ध्या तासात आपण त्या गावाकडं निघू." पी. एस. आय. पाटील अतिशय हुशार आणि कार्यक्षम होते. त्यांनी लगेच सगळी जोडणी केली. आमची गाडी पुढे आणि ट्रक मागे अशी वरात निघाली.

काही अंतर गेलो असू, तो समोरनं एक जीप येताना दिसली. प्रांत आणि पोलीस अधिकारी येत होते. आम्हाला पाहिल्यावर त्यांनी गाडी थांबवली. प्रांत उतरले आणि म्हणाले, "चला, जरा आंब्याच्या झाडाखाली बसू, सांगतो सगळं."

"काय झालं साहेब?"

"काय झालं नाही, ते विचारा. अहो, कसली ज्वारीची लेव्ही! अधिका-यांचा जीव टांगणीला लागायचा."

"पण झालं काय?"

"सांगतो ना. अहो, गावात गेलो. देवळापाशीच चावडी. कोतवाल होता. त्याला तलाठ्याला बोलावून आणायला सांगितले. तो आल्यावर त्याला निनावी अर्ज दाखवला. तलाठ्याच्या सगळं लक्षात आल्यावर त्यानं अर्जात सांगितलेल्या सरपंचाला बोलावून आणलं.

"सरपंच आले. सरपंच कसला, साक्षात कर्दनकाळ! सहा-साडे सहा फूट उंची. ह्याऽऽ काळ्याभोर दाढीमिशा, मोठाले लालभडक डोळे, जाड ओठ, चेहरा तावदारलेला आणि भाव सगळे तिरसट आम्हा दोघांना तर घाम फुटला त्याच्याशी न बोलता

"आम्ही तलाठ्याला बाजूला घेतलं आणि सरपंचाबद्दल विचारलं. तलाठ्यानं सांगितलं, तेही सगळं भयंकर. तो शिक्षा भोगून आलेला आहे. त्याच्या एका फौजदारी केसमध्ये एका कुलकर्ण्याने त्याच्या विरूद्ध साक्ष दिली. हा सरपंच तुरुंगात गेला. शिक्षा संपल्यावर ह्यानं त्या कुलकर्ण्यांचं गाव गाठलं. कुलकर्ण्याच्या शेतावर गेला. त्यानं त्याला बकोटीला धरलं आणि झाडाला बांधलं. पोतं उचलण्यासाठी हमाललोक हूक वापरतात तो त्यानं धोतरातनं बाहेर काढला आणि कुलकर्ण्यांच्या डोळ्याच्या खोबणीत घालून भसकन् दोन्ही डोळे काढले आणि रानात फेकून दिले. कुलकर्णी ओरडओरड ओरडला; पण जवळपास कुणीच नव्हतं. त्या बांधलेल्या आणि डोळे काढलेल्या अवस्थेत तो कुलकर्णी चार तास होता. घराकडून गडी आणि बायको आली, तेव्हा बिचा-याची सुटका झाली. आंधळा कुलकर्णी अजून जिवंत आहे. तलाठी आहे. तलाठी म्हणाला, एकदा रावसाहेबांना नेऊन दाखवतो. प्रांतसाहेब पुढे म्हणाले" हे ऐकल्यावर कोण थांबतो तिथं? आम्ही गाडी फिरवली आणि काही न बोलता आलो. आता तलाठ्याने सरपंचाला काय सांगितले असेल ते तपासा. आणि मी म्हणतो एखादं गाव लेव्हीच्या बाबतीत वगळलं तर काय बिघडलं? तुम्ही तरी कशाला जाता तिकडं?"

मलाही जरा हे भयानक वाटलं. पण कसल्याही परिस्थितीशी टक्कर द्यायचा माझा स्वभाव जागा झाला. पूर्वीही एका गावाबाबत मला असं सांगितलं होतं, की "तुम्ही लेव्हीला त्या गावी जाऊ नका. तिथं कडवा विरोध होता. तिथला एक मास्तरच तिथल्या गावाच्या भानगडीत असतो. तो कुणालाच लेव्ही देऊ देत नाही." पण मी त्या गावाला पोलिस तुकडीसह गेलो आणि लेव्ही वसूल केली. आता दुसरा अनुभव कसा येतो, हे डोक्यात शिजत होतं.

मी प्रांतसाहेबांना म्हणालो, "साहेब तुम्ही अक्कलकोटच्या रेस्टहाउसमध्ये थांबा. काय करायचं ते करून मी संध्याकाळपर्यंत येतो. पी. एस. आय. पाटीलसाहेब माझ्या सोबतीला आहेतच. घेतो काय घ्यायचा तो समाचार."

"अहो, पण..........." – प्रांत

"नका काळजी करू. बघू काय होतं ते. मी येतोच रेस्टहाउसवर सगळं सांगायला." ड्रायव्हरला खूण करून मी लगेच त्या दोघांचा निरोप घेतला.

हन्नूरला पोचलो. तलाठी बुचकळ्यात. प्रांतसाहेब आत्ताच गेले आणि रावसाहेब कसे लगेच इतका ताफा

घेऊन आले?

गेल्याबरोबर सरपंचाला बोलावून आणायला तलाठ्यानं कोतवालाला पाठवलं. तोपर्यंत सरपंच रानात गेलेला. बोलावून आणेपर्यंत आम्ही सरपंचाच्या पेवापाशी गेलो. मजुराकडून पेवाचं तोंड उघडून घेतलं. गूळ खायला देऊन, कंदील घेऊन दोन मजुरांना आत उतरायला सांगितलं. एकानं दोर बांधलेल्या टोपलीत ज्वारी भरायची आणि दुस-यानं ती वर कशी जाईल ते पाहायचं. सगळं व्यवस्थित सुरू झालं. पेवापासल्या ताडपत्रीवर ज्वारी भराभर येऊ लागली. जवळजवळ एक तासानं सरपंच अवतरला. त्याचं ते राक्षसी रूप पाहून खरंच अचंबा वाटला. पण काय जादू झाली कोण जाणे! त्यानं अगदी वाकून नमस्कार केला. बहुतेक कोतवालानेच त्याला ह्या प्रकारातल्या गांभीर्याची कल्पना दिली असावी. पण त्याची पूर्वीची कथा ऐकून जरा सावध झालो. पी. एस. आय. पाटील यांच्याशी थोडं बोलल्यावर असं ठरलं, की सगळी ज्वारी काढेपर्यंत साळसूदपणे वागायचं आणि नंतर त्याला अटक करूनच अक्कलकोटला न्यायचं. अर्ध्या तासानंतर त्याचं पेव रिकामं झालं. पाटील हळूच त्याच्याजवळ गेले आणि म्हणाले "आता जबाबासाठी अक्कलकोटला गेले पाहिजे. बसा ट्रकमध्ये."

अगदी गुपचूप, सरपंच ट्रकमध्ये बसल्याबसल्या, कॉन्स्टेबलच्या साहाय्याने त्याला हातकड्या घातल्या. आणि आमचं हे व-हाडं अक्कलकोटला निघालं.

संध्याकाळी ६ वाजता आम्ही अक्कलकोटच्या रेस्टहाउसवर पोचलो. प्रांतांना बाहेर बोलावून सगळं दाखवलं. नंतर चहा वगैरे घेऊन प्रांत आणि ते आय. पी. एस. अधिकारी सोलापूरला निघून गेले.

वास्तविक इतकी कठोर कारवाई करण्याची गरज नव्हती. आम्हा दोघांना तेवढा अधिकारही नव्हता. हे आम्हाला माहीतही होते; पण वेळप्रसंगी असं धाडस करावं लागतं, असा आमचा विचार झाला होता.

गंमत अशी की, तलाठ्याच्या नंतर लक्षात आलं होतं, की लेव्ही आकरणीबद्दलचं जाहीर परिपत्रक चावडीवर लावून शेतक-यांना तशी समज देणं आवश्यक होतं; पण ते करायचं राहून गेलं होतं. पण तलाठी हुशार. त्याने तहसिलदार कार्यालयातून ते परिपत्रक मिळवलं, जुनी तारीख त्यावर घातली आणि ते चावडीवर चिकटवलं. नंतर त्याचा पंचनामा केला व पत्रक पी. एस. आय. पाटलांच्या केसपेपर्समध्ये घुसडून दिलं.

केस सुरू झाली. सरपंचांना कोर्टापुढे उभं केलं. नंतर दोन दिवस गेले. जज्ज सोनी यांनी मला त्यांच्या खोलीत बोलावलं. ते म्हणाले "रावसाहेब, काय काय उद्योग करता हो? हा कसला हन्नुरचा राक्षस उभा केलात माझ्यापुढे?"

मला हसू आलं. मी त्यांना झालेलं सगळं सांगितलं. दोन महिने केस चालली. निकाल दिल्यावर पुन्हा जज्जांनी खोलीत बोलावलं आणि सांगितलं, "रु ५०००/- दंड केला. सगळी पोती जप्त करून सरकारजमा करण्याचा आदेश दिला. पण इथून पुढे आता असलं काही करत जाऊ नका. तुमचा एवढा सज्जड पुरावा असल्यामुळे मला शिक्षा देताना काहीच अडचण आली नाही."

(२)

एकदा एका संगणक क्षेत्रातल्या तरुणाला भेटायला त्याच्या घरी गेलो. त्याच्याकडे त्याचे म्हातारे वडील आलेले होते. कुटुंब मूळचे अमरावती जिल्ह्यातले. उत्सुकता म्हणून विदर्भातल्या शेतक-यांबाबत विचारावेसे वाटले.

"नमस्कार! केव्हा आलात?"

"झाले दोन-तीन दिवस."

"मुक्काम?"

"बघू. चिरंजीवांनी फारच धोसरा लावला म्हणून आलो दोघंजण. जाण्याची तारीख काही ठरलेली नाही. सातारा-कोल्हापूर काही स्थळं पाहून जाऊ."

"गावाकडची काय खबरबात? तिकडचे शेतकरी फार प्रेमळ आणि अतिथ्यशील असतात ना?"

"ते तसे होते. पण आता तसे राहिले नाहीत."

"का?"

"आता परिस्थिती बदललीय. आमच्यासारख्या ब-यापैकी जमिनी असणा-या शेतक-यांना मजूर मिळत नाहीत. आले तरी पूर्वीसारखी कामं करीत नाहीत."

"म्हणजे? पूर्वी कशा त-हेची परिस्थिती असायची?"

त्या म्हाता-याच्या डोळ्यांतले भाव एकदम बदलले. बहुधा जवानीतल्या स्मृती जागृत झाल्या असाव्यात. थोडं थांबून म्हणाले, "अहो, काय ते दिवस होते सांगू!

पहाटे पाच वाजता मजूरमंडळी आमच्या शेताकडे जायची. आमचं शेत गावापासून एक-दीड किलोमीटर लांब. पण ही माणसं सबंध दिवसभर शेतकामासाठी जे जे लागायचं, ते ते घेऊन दिवस उगवायच्या आत तिथं पोचायची. आमच्याकडे ऊन भरपूर. दुपारी कामं होणार नाहीत. सकाळी ९ पर्यंत कामं उरकायची. मग न्याहरी, जेवण उरकून दुपारचं ऊन उतरल्यावर पुन्हा एक-दोन तास कामं करून परत फिरायची. पिकाची निगराणी तर इतकी छान ठेवायची, की मुद्दाम गाडी जुंपून आणि आम्हाला आग्रह करून पिकं पहायला न्यायची. चोरी-चपाटी तर बिलकूल नाही."

"मग आता हा बदल का झाला? त्यांचं तुमच्यावरचं प्रेम का आटलं? माणसं इतकी आणि इतक्या लवकर का बदलली? काहीतरी चुकलं असं तुम्हाला नाही का वाटत?"

"आमच्याकडनं काय किंवा त्या मजुरांकडनं काय, काही फार मोठ्या चुका झाल्यात, असं वाटत नाही. पण आमच्या दोघांच्याही–म्हणजे दोन्ही पक्षांच्या– पदरी नियतीनं घाला घातलाय असं वाटतंय."

"म्हणजे? इतकी चांगली माणसं एकमेकांपासून इतक्या झपाट्यानं नियतीनं बिघडवली असं म्हणायचंय का?"

"तसं नाही. पण असा एक काळ आला की, माणसाला पैशाचं महत्त्व जास्त वाटू लागलं. पूर्वी कसं होतं ते जरा विस्तारानं सांगतो. गावातल्या सगळ्या जमिनी आमच्यासारख्या सुखवस्तू जमीनदारांकडं असल्या, तरी त्यांनाही सगळाच फायदा आपल्याला मिळाला पाहिजे अशी इच्छा नसे. म्हणजे पहा की, आम्ही आंबे उतरवले तर ते विकत नव्हतो. सगळ्या कुळांना बोलावून, त्यांना हवे तितके देऊन उरलेले आम्ही घेत होतो. हेतू हा की, त्यांच्याकडं पोरंबाळं, बायका यांनी आंबे खाण्याचा आनंद लुटावा. आम्ही घरात कितीशी माणसं? चार किंवा सहा! आणि समजा एखादं मोठं जमिनदारांचं कुटूंब असलं, तर गडी माणसंच अगोदर त्या कुटुंबाला किती आंबे लागतील याचा विचार करून उरलेले आंबे स्वतः वाटून घ्यायची. अशी प्रेमाची नाती कुठल्या परकीय समाजात दिसतील? दूध, ताक, शेतातली पालेभाजी, थोडीबहूत कडधान्यं, ही तर त्यांच्याच मालकीची समजून उरलेला माल ते घरी आणून टाकत. दुसरं असं की, गडीमाणसांच्या घरी लग्नाचं प्रकरण निघालं, तर आपल्याच घरचं कार्य आहे असं समजून आम्ही त्यांना हवी ती मदत करत होतो. त्यांच्या घरी कधी कुणी आजारी पडलं तर दवाखान्याचा सगळा खर्च आम्हीच भागवायचो. आता सांगा, असं घरगुती वातावरण असलं तर कोण कशाला लबाडी करेल? त्यातच त्यांना बाहेरच्या धावत्या जगाचं वारं लागलं नव्हतं. पिढीजात मूल्यं जपताना त्यांना फारसे कष्ट पडत नव्हते आणि म्हणूनच चो-या, लांड्या-लबाड्या असले प्रकार नसत. अगदी सुखेनैव हंगामापाठोपाठ हंगाम अशी कामं चालायची. गडी-माणसांच्या बायका आणि आमच्या घरातल्या स्त्रिया यांच्या तर पापड, कुरडया, लोणची अशा घरगुती गोष्टी हसतखेळत चालायच्या. वातावरण कसं प्रसन्न असायचं. जणूकाही सगळं गाव म्हणजे एक कुटुंबच! प्रत्येक घरातल्या प्रत्येक माणसाचं नाव प्रत्येकाला माहीत असायचं.

"आता शेजारच्या घरात काय चाललयं हे शहरातल्या फ्लॅट सिस्टीममधल्या माणसाला माहीत असतंय का? आणि हाच प्रकार हळूहळू आमच्या खेड्यात उतरत गेला. हे आपोआपच होत असतं. काय झालं, पैशानं सगळं मिळवता येतं ही तरुण पिढीची भावना बळावत गेली; आणि इथं सगळं बिघडलं. आता हे पुन्हा पहिल्यासारखं होईल, असं वाटत नाही!"

त्या वडीलधा-याचं हे विवरण ऐकून मी एकदम थिजून गेलो, इतक्या सहजतेनं त्यानं बदललेल्या परिस्थितीचं किती छान विश्लेषण केलं! मुख्यतः, आता हे पहिल्यासारखं होणं कठीण हा त्यांचा अभिप्राय तर परिस्थितीवर विदारक प्रकाश टाकणारा.

वरच्या ऐकीव अनुभवाचासुद्धा मला खूपच मानसिक त्रास झाला. मनात आलं, व्यक्तिगत शेतीची मशागत, त्याभोवती फिरणारं शेतक-याचं, मजुराचं आयुष्य व त्यातील ताणतणाव हे जर इतक्या झपाट्यानं घरंगळत चाललंय, तर मग एखाद्या संस्थेच्या शेतीचं काम कसं चालणांर? आपणच काहीतरी करून हे थोडं बदलल पाहिजे.










सुदैवानं तशी एक संधी मला मिळाली. बुलढाण्याला जिल्हा परिषदेचा मुख्य कार्यकारी अधिकारी (सी. इ. ओ.) या पदावर रूजू झालो. जिल्हा परिषदेच्या जनरल बॉडीच्या सभेला हजर राहणे बंधनकारक होते. पण इतर सभा म्हणजे शिक्षण समिती, बांधकाम समिती, शेती समिती, यांच्या मासिक सभांना मी हजर राहिले पाहिजे, अशी अपेक्षा नव्हती. मात्र अशा सभांची नोटीस मला येत असे. अशी एकदा शेती समितीच्या सभेची नोटीस आणि अजेंडा माझ्याकडे आला. त्यात एक विषय होता, 'जी. प. कडील शेतीवर गवताची वाढ झाली आहे. दरवर्षीप्रमाणे त्या गवताचा लिलाव.' हा विषय पाहून मी स्वतःहूनच सभेत हजर झालो. हा विषय चर्चेला आल्यावर मी विचारले, की "ही जमीन कुठे आहे?"

"ही काय, बुलढाणा बसस्टेशनच्या मागे."

"किती जमीन आहे?" – मी

"सहा एकर"

"इतक्या जवळ? आणि आपण त्यावर शेतीचं काही उत्पन्न घेत नाही?" – मी

"नाही."

"मग माझी एक विनंती आहे. आपण असेच सगळे जण उठून ती जमीन पहायला जाऊ. मला बघायची आहे ती जमीन."

सभासदांना हे सगळं निराळं पण उत्साहाचं वाटलं. समितीचे अध्यक्ष बाहेकरही लगेच तयार झाले. आणि आम्ही भर उन्हात त्या जमिनीवर जाऊन पोचलो.

जमिनीवर गवत कापून ढीग ठेवले होते. जमीन मात्र खूप पिकाऊ, सपाट, आणि कुठलंही उत्पन्न देऊ शकणारी आहे, असं शेती अधिका-यानं सांगितलं. संपूर्ण सहा एकर शेताला तारेचे कुंपण; म्हणजे अतिक्रमणाची भीती नव्हती. शेतीच्या उत्तर बाजूला शेती खात्याचं फळबाग संशोधनाचं केंद्र होतं. जरा खोलात जाऊन विचारलं तेव्हा कळलं, की जि. प. ची ही जमीन फळबाग संशोधनासाठीच होती. पण शासनाचा A. N. P चा प्रोग्रॅम (ॲपलाइड न्युट्रिशन प्रोग्रॅम) जि. प. कडे वर्ग झाल्याने या शेतीतून शास्त्रीय पद्धतीने येणा-या उत्पन्नाचा उपयोग जि. प. च्या प्राथमिक शाळेतल्या विद्यार्थ्यांना न्याहारीसाठी व्हावा, हा उद्देश होता. शासनाकडून ही जमीन वर्ग करण्याबाबत एक तार आली होती. तेव्हापासून ही जमीन जि. प. कडे आली.

"मग शासनाच्या आदेशाप्रमाणे इथे काही A. N. P चा प्रोग्रॅम राबवला गेला का?" – मी

सगळेजण स्तब्ध.

फळबाग संशोधन विभागाने पाण्याच्या सोयीसाठी जवळच एक तळे बांधले होते. म्हणजे पाण्याचा पुरवठा होता. ते पाहून तर माझ्या तोंडाला पाणीच सुटले.

"आपल्याला हे पाणी आपल्या शेतीसाठी सहज उचलून आणता येईल, नाही का?" – मी

"हो. का नाही? पाणी काही लांब नाही. दहा हॉर्स पॉवरच्या मोटारीने सहज आणता येईल. आपल्या भांडारात तर एक-दोन इंजिनं तशीच पडून आहेत. त्यांचा उपयोग करता येईल." – शेती अधिकारी

माझ्यातला शेतकरी जागा झाला. मी जि. प. अध्यक्षांना विचारून एक दिवस ठरवला. जि. प. मधील सर्व कर्मचारी, चिखली पंचायत समितीचे काही कर्मचारी यांनी त्या दिवशी सकाळी आपआपले जेवणाचे डबे घेऊन ८.०० वाजता श्रमदानासाठी जमायचं आहे, असे ठरविले. त्या दिवशी पदाधिकारी एक-दोनच आले, पण जि. प. अध्यक्ष मात्र वेळेवर आले. हे अध्यक्ष उच्चशिक्षित असूनही अतिशय साधे होते. गांधीवादी होते. साधा पायजमा, सदरा, टोपी व सगळे खादीचे, असा त्यांचा पोशाख असे. इंग्रजी तर खूप छान बोलायचे. अधिकाराचा तर त्यांना अजिबात दर्प नव्हता. मला तर ते आदर्श नेता वाटायचे. नेत्याने असेच नम्र, ज्ञानी आणि सभ्य असले पाहिजे, अशी माझी धारणा होती. त्यांनी केलेलं एका संतवचनाचं परीक्षण ऐकूण मी त्यांच्या पाया पडलो होतो.

त्यांनी कुदळ घेऊन सुरुवात केल्यावर श्रमदान सुरू झाले. आम्ही दुपारी सहभोजनाला बसलो. कर्मचा-यांना हा अनुभव अगदी नवा होता. सर्वांनी मला वचन दिलं, की तुमच्या मनात आहे ते स्वप्न आम्ही प्रत्यक्षात आणून दाखवू. माझा उद्देश साध्य झाला. एखादं नवं आणि अवघड काम हाती घेतलं, तर सगळ्यांची त्यात इनव्हॉल्व्हमेंट असावी लागते.

मी मग एका तज्ज्ञांची निवड करायला सुरुवात केली. एका शेतकी अधिका-याला फुला-फळझाडांच्या नर्सरीची आणि मशरूम शेतीची सखोल माहिती होती. एकाला बियाणे प्लॉट कसे करावे, हे माहीत होते. मत्स्य विभागाच्या अधिका-याला तर साध्या मृगळ, रोहू, कटला अशा माशांच्या शेतीपासून ते गोड्या पाण्यातल्या प्रॉन्सपर्यंत सगळ्या माशांचे उत्पादन कसे घ्यावे, हे माहीत होते. त्यांच्या साहाय्याने ९० मी x ३० मी अशा क्षेत्राचे तळे खोदून घेतले. ६ फूट खोली. त्यात ५ फूट पाणी भरून रोहू, कटला, मृगळ या माशांबरोबर जम्बो प्रॉन्सची शेती त्याने सुरू केली. त्याला हवेनको ते वेळेवर मिळाले पाहिजे, याची मी जातीने काळजी घेत असे. त्यामुळे हा गोड्या पाण्यातल्या मत्स्यशेतीचा प्रयोग इतका यशस्वी झाली, की आसपासचे शेतकरी व व्यापारी तळे पाहायला येऊ लागले. पुढारीही येऊ लागले. जि. प. चे सर्व पदाधिकारी तर एकदम खूष. (त्यांची फक्त एकच अडचण की, त्यांना किंवा कुणालाच मासे फुकट मिळणार नाहीत अशी व्यवस्था मी लावून दिली होती.)

ही बातमी पालकमंत्र्यांकडे गेली. त्यांनी एकदा 'आम्हाला केव्हा प्रॉन्सची पार्टी देणार?' असे विचारल्यावर "आम्ही अधिकारी थोडी वर्गणी काढून अगदी जरूर पार्टी देऊ." असे आश्वासन मी त्यांना दिले. खूप समंजस होते ते. "इतकं सुंदर व्यवस्थापन असेल तर मला नको तुमची पार्टी; असंच लोकोपयोगी काम करत राहा," असं ते म्हणाले.

या शेतावरील सगळे प्रयोग ८/९ महिन्यांत यशस्वी झाले. गहू काढल्यावर त्याच्या काडाचा उपयोग करून मशरुम शेती केली. ती तर लोकांना इतकी आवडली, की गावातल्या एका सुनेनं ते सगळे तंत्रज्ञान आत्मसात केले आणि स्वतःच शेड उभारून हा व्यवसाय बुलढाण्यातच सुरू केला!

आपण प्रॉन्स केले; पण ते खरंच विक्रीयोग्य फायद्याचे ठरतात का, हे पाहण्यासाठी आम्ही एकदा मोठ्या काचेच्या पेटीत पाणी आणि बर्फ भरून प्रॉन्स औरंगाबादला गेलो. दोन-तीन किलो होते. औरंगाबादच्या एका पंचतारांकित हॉटेलमध्ये गेलो आणि मॅनेजरला भेटून दाखवले.

"हे कुठून आणले, बुलढाण्यातून का?"

"हो. तुम्हाला कसं माहिती?"

"अहो, चांगल्या गोष्टीची जाहिरात करावी लागत नाही. इथं तुमच्या व्यतिरिक्त कुणी करतं असं साधं ऐकिवातही नाही. इथपर्यंत पोचलीय किर्ती त्याची! असं करतो शेफला बोलावतो." शेफ आला. त्यानं पहिल्याबरोबर जे डोळे विस्फारले, ते अजून मला आठवतात.

"साहब, आप इनको हमारे हवाले कर दो."

"क्या किंमत दोगे, पर किलो?"

"आप कितना मांगते? माल तो आपका है"

"नहीं, वो बात अलग है. आप क्या दोगे पर किलो?"

"तीनसो रुपये ठीक होंगे. अगर आप रेग्युलरली देना तय करते तो मैं मॅनेजरसाहब को १ लाख रुपये अॅडव्हान्स देने की रेकमेंडेशन करता हूँ."

अरे बापरे! म्हणजे इतके महाग आणि इतकी याची डिमांड आहे? तथापि हा काही जिल्हा परिषदेचा व्यवसाय नाही. प्रात्यक्षिक लोकांपुढं ठेवलं तर बुलढाण्यातल्या जवळजवळ ९० तळ्यांमध्ये हा प्रयोग राबवता येईल, हा त्यामागचा हेतू होता. तो आता तडीस जाईल, अशी मला आशा वाटून गेली. ते तीन किलो आम्ही तेथे विकले आणि आमचा मार्ग धरला.

शेतात थोडी लिंबाची, केशरी आंब्याची आणि आवळ्याची रोपं लावली. हेतू हा की, चांगली शेती कशी करावी, याचं शेतक-यांना प्रात्यक्षिकाद्वारे शिक्षण मिळावं. सगळं शिवार कसं मस्त फुलल होतं! अधिकारीही त्यावर मेहनत घेत होते. मी तर सकाळी अर्ध्या पॅन्टीतच एक चक्कर टाकून मग टेनिस खेळायला जायचो.

चिखलीत एक माजी आमदार होते, ते भेटून गेले. त्यांनी खूप कौतुक केले. म्हणाले, "करावं तर हे पश्चिम महाराष्ट्रातल्या अधिका-यांनीच करावं." मी फार्मवर नसलो तरी ते तिथं उभ्या केलेल्या बांबूच्या गोल झोपडीत काही काळ बसून जात असत. कधीकधी तर घरचा डबाही तिथंच खायचे. तसं पाहता शेतीतल्या या पिकाचं आधुनिक तंत्रज्ञान मला फार अवगत होतं, असं नाही.








पण मी ते नेटानं राबवून घेत होतो. हा माझ्या नोकरीतला शेवटच्या दोन-तीन वर्षांचा काळ होता. इथल्या प्रयोगाचा मला निवृत्तीनंतरही फायदा होणार होता. त्या कल्पनेनेच मी सुखावत होतो. नोकरीच्या प्रत्येक ठिकाणच्या पदावर आपल्या कर्तृत्वाचा काहीतरी ठसा असायला हवा, ही आम्हाला नोकरीच्या सुरुवातीला शिकवण दिली गेली होती.

झालं. काही दिवसांनी नाशिकला बदली झाली. तिथंच निवृत्त झालो.

त्यानंतर ब-याच वर्षांनी शेगावच्या गजानन महाराजांच्या दर्शनाला जाण्याचा योग्य आला. म्हटलं, बुलढाण्यावरून जावं. आपलं अपत्य कसं वाढतंय, ते पाहावं.

कसलं काय! सगळं व्यर्थ! आता तिथं काही नव्हतं. मन विषण्ण झालं.

थोडक्यात काय, तर आत्मीयता संपली की सगळंच संपतं! शेतकरी/ मजुरातली काय किंवा एखाद्या संस्थेच्या आयुष्यातल्या अधिकारी पदाधिका-याची काय!

आत्मीयता हा सगळ्याचा आधार आहे.



---



अनुक्रमणिका

# विचारवंत शेषराव मोरे

म. ई. तंगावार

नरहर कुरुंदकरांच्या विचाराने प्रभावित झालेले शेषराव मोरे यांनी नांदेडचे नाव कुरुंदकरानंतर उज्ज्वल केले. कुरुंदकरांच्या विचारांचीच परंपरा विस्ताराने आपल्या साक्षेपी, अभ्यासपूर्ण व चिकित्सक पद्धतीने पुढे चालविली. त्यांचा एकेक ग्रंथ म्हणजे एकेक प्रबंध नव्हे, तर अनेक प्रबंधांची नांदी होय. रात्रंदिवस भ्रमंती करून ज्ञानक्षेत्रातील या संन्याशाने संशोधक दृष्टीने जे ग्रंथ लिहिले, ते संशोधकाला प्रेरणा देणारे आहेत. काटेकोर मांडणी, परखड विचार व अभ्यासपूर्ण लेखन यांसाठी ज्येष्ठ बुद्धिवादी विचारवंत म्हणून शेषराव मोरे विशेषतः बुद्धिवादी वर्गातील लोकांना अधिककरून ज्ञात आहेत.

'सावरकरांचा बुद्धिवाद : एक चिकित्सक अभ्यास' व 'सावरकरांचे सत्य आणि विपर्यास' या मौलिक ग्रंथांमुळे सावरकरवादी विचारवंत म्हणून त्यांच्यावर शिक्का मारण्यात आला. पण मुळात मोरे यांना कुठलाच विषय वर्ज्य नव्हता. त्यांचे 'अप्रिय पण....' सारखे पुस्तक वाचल्यानंतर हे लक्षात येईल. इतिहास, समाजशास्त्र, धर्म, महापुरुषांचे विचार व राष्ट्रीय प्रश्न हे त्यांच्या चिंतनाचे विषय होत. बहुजनांतील वैचारिक लेखक म्हणजे शेषराव मोरे. याशिवाय 'काश्मीर : एक शापित नंदनवन', 'आंबेडकरांचे सामाजिक धोरण : एक चिंतन', 'मुस्लीम मनाचा शोध', 'प्रेषितानंतरचे पहिले चार आदर्श खलिफा' (अर्थात इस्लामचा सुवर्णकाळ), '१८५७ चा जिहाद', 'विचारकलह' भाग एक व दोन, 'शासनपुरस्कृत मनुवादी : पांडुरंगशास्त्री आठवले', काँग्रेसने आणि गांधीर्जीनी अखंड भारत का नाकारला?' इत्यादी त्यांची पुस्तके वैचारिक साहित्यात भर घालणारी आहेत.

'सावरकरांचा बुद्धिवाद : एक चिकित्सक अभ्यास' हे त्यांचे पहिलेच पुस्तक महाराष्ट्रात वैचारिक थैमान घालणारे ठरले. या पुस्तकामुळे मोरे हे ब्राह्मण असले पाहिजेत, असा अनेकांचा गैरसमज झाला. परंतु ब्राह्मणाला नको असलेला सावरकरांचा बुद्धिवाद शेषराव मोरे यांनी सबंध महाराष्ट्राला परिचित करून दिला. विज्ञानालाच सावरकरांनी वेद कसे मानले? सावरकरांचे हिंदुत्व हेच राष्ट्रीयत्व कसे आहे? सावरकर प्रखर बुद्धिवादी व राष्ट्रवादी विचारवंत कसे आहेत, हे असंख्य पुराव्यांनिशी सप्रमाण लेखकांनी दाखवून दिले. याच ग्रंथाची संक्षिप्त आवृत्ती म्हणजे 'सावरकरांचा बुद्धिवाद आणि हिंदुत्ववाद' होय. सावरकरांवरील 'सावरकरांचा बुद्धिवाद : एक चिकित्सक अभ्यास' या पहिल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत ग. वा. बेहेरे लिहितात की, "सावरकर जर संपूर्ण समजून घ्यायचे असतील तर ते एक अखंड विणीचे वस्त्र आहे आणि ते विधात्याने इतके काळजीपूर्वक विणलेले आहे, की ज्याचे विधात्यालासुद्धा आश्चर्य वाटते." [१] (ग. वा. बेहेरे, सावरकरांचा बुद्धिवाद : एक चिकित्सक अभ्यास, प्रस्तावना, पृ. ९). सूक्ष्म व वस्तुनिष्ठपणे सावरकरांचा बुद्धिवाद पुराव्यासह शेषराव मोरे यांनी वाचकांसमोर ठेवला आहे. राष्ट्रवाद व बुद्धिवादाची पूजा करणारे सावरकर बुद्धिवादी असूनही स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळात उपेक्षित राहिले होते. ती उणीव लेखकांनी या ग्रंथाच्या माध्यमातून भरून काढली. सावरकरांच्या कर्मठ विरोधकांना व आंधळ्या अनुयायांना या ग्रंथातील निष्कर्ष पटणार नाहीत, हा विचार भूमिकेतच लेखकांनी विशद केलेला आहे.

'सावरकरांना अभिप्रेत असलेला धर्म', 'बुद्धिवाद : काही निवडक गोष्टीसंबंधी', 'श्रद्धेचा डोळस उपयोग', 'सावरकरांचे अध्यात्म', 'नीतिमूल्यांचा पाया : बुद्धी!' 'हिंदुत्व म्हणजे काय?', 'भारतीयत्वासाठी हिंदुत्व', 'सावरकरांचा सेक्युलॅरिझम' इत्यादी प्रकरणांत छोटेछोटे पण अभ्यासपूर्ण व अर्थपूर्ण न्याय देणारे मुद्दे घेऊन लेखकांनी विश्लेषण केले आहे. नीतिमूल्यांचाच पाठ सावरकरांनी आयुष्यभर गिरविला. पाठ गिरविताना अनेक संकटे आली, परंतु त्यांवर मात करून सावरकरांनी वाटचाल केली.

सावरकरांच्या संदर्भात विचार मांडताना लेखक "नीतिमूल्यांचा पाया : बुद्धी!" या लेखात लिहितात की, "सावरकरांचे नीतिविचार कोणत्या धर्मावर, धर्मग्रंथावर,

अनुक्रमणिका







ईश्वरावर, अध्यात्मावर, अतींद्रिय अनुभवावर आधारलेले नव्हते, तर ते भरभक्कम व वस्तुनिष्ठ अशा बुद्धिवादावर आधारलेले होते. सावरकर उदात्त नीतिमूल्येच मानणारे होते; पण ती मूल्ये अद्याप जगात वास्तवात आलेली नाहीत, असे त्यांचे म्हणणे होते. ज्याप्रमाणे धर्मग्रंथ हे ईश्वरोक्त नाहीत, मानवनिर्मित आहेत, चातुर्वर्ण्य मानवनिर्मित आहेत हे सांगणे हा बुद्धिवाद असतो, त्याचप्रमाणे आज उदात्त मूल्यांचा स्वर्ग जगात अद्याप अवतरला नाही, हे सांगणेही बुद्धिवादच असतो."[२] (शेषराव मोरे, सावरकरांचा बुद्धिवाद आणि हिंदुत्ववाद, पृ. १०४-१०५). राष्ट्राची इमारत विज्ञानग्रंथाच्या पायावर उभी केली पाहिजे, धर्मग्रंथाच्या पायावर नव्हे, असे विचार मांडणा-या सावरकरांचा धर्मावरदेखील विश्वास नव्हता, हे वास्तव सत्य लेखकांनी सांगितले आहे. सावरकर जिवंत असताना जर शेषराव मोरेंसारखा लेखक, अनुयायी त्यांना मिळाला असता, तर सावरकरांचा आनंद गगनात मावेनासा झाला असता. 'देर है लेकिन अंधेर नहीं' या उक्तीप्रमाणे उशिरा का होईना, या ग्रंथाद्वारे सावरकर योग्य त-हेने समजतील यात तीळमात्र शंका नाही.

'सावरकरांचे समाजकारण : सत्य आणि विपर्यास' हा शेषराव मोरे यांचा याच विषयाशी निगडित सावरकरांवरचा दुसरा ग्रंथ १९९२ साली प्रकाशित झाला. सावरकर हे केवळ समाजसुधारक नाहीत; तर समाजक्रांतिकारक आहेत, हे सत्य सांगून महाराष्ट्रातील सावरकरांच्या समाजकारणाचा विपर्यास करणा-या अभ्यासकांचा लेखकांनी पुराव्यानिशी समाचार घेतलेला आहे. क्रियाशील क्रांतिकारकांच्या पंक्तीत बसणा-या सावरकरांचे सामाजिक विचार, धोरण या ग्रंथात आलेले आहे. उक्तीपेक्षा कृतीला महत्त्व देणा-या सावरकरांनी विवाह करताना जन्मजातीचा विचार न करता केवळ गुणवत्तेचा विचार केला पाहिजे असे सांगून स्वातंत्र्यपूर्वकाळात आंतरजातीय विवाहाचे समर्थन केले होते. १९ प्रकरणे व ६८९ पृष्ठसंख्या असलेला हा ग्रंथ लिहिताना सावरकरांच्या संदर्भात ज्या ज्या अभ्यासकांनी लेखन केले आहे, त्या सर्व विचारांचे पुराव्यानिशी खंडणमंडणात्मक विचार मोरे यांनी मांडले आहेत. आंबेडकरांच्या सामाजिक धोरणात परिवर्तन कसे होत गेले, हे चिकित्सकपणे लेखकांनी 'डॉ. आंबेडकरांचे सामाजिक धोरण : एक अभ्यास' या पुस्तकात सांगितले.

आपला धर्म तर आपल्याला त्या वातावरणात, संस्कृतीत वाढत असल्यामुळे समजत असतो. इतर धर्मांचा अभ्यासही करावा, या जिज्ञासेपोटी शेषराव मोरे यांनी 'मुस्लीम मनाचा शोध' व 'प्रेषितानंतरचे पहिले चार आदर्श खलिफा' हे ग्रंथ लिहिले. 'मुस्लीम मनाचा शोध' हा ग्रंथ लिहिण्यासाठी डोंगराएवढे कष्ट लेखकांनी कसे घेतले, हे ग्रंथ अभ्यासल्यानंतर निदर्शनास येईल. यात महमद पैगंबराचे चरित्र, कुरआन व हदीस या तीन गोष्टींवर भाष्य केले आहे. यासाठी मराठी, हिंदी व इंग्रजी भाषेतील कुराणाच्या बारा प्रती मिळवून लेखकांनी सूक्ष्म अभ्यास केला. दोन महिने दिल्लीतील मुस्लीम अभ्यासकांशी चर्चा केली. ग्रंथ निर्दोष व्हावा म्हणून इस्लामच्या अभ्यासकाकडे ग्रंथ प्रकाशित होण्याआधी पाठवून दिला. मुहंमद मुस्तफा अभिप्राय देतात की, "या ग्रंथरूपाने इस्लामबद्दल मराठी भाषेच्या खजिन्यात अमोल ठेवा लेखकाने ठेवला आहे. या ग्रंथाने २१ व्या शतकारंभी नव्या युगास निरुपम देणगी दिली आहे"[३] (मुहंम्मद मुस्तफा, मुस्लीम मनाचा शोध, अभिप्राय, पृ. ८) प्रेषितांचा जीवनादर्श (मक्का, मदिना काळ), कुराणाचे स्वरूप, पूर्वप्रेषितांच्या बोधकथा, ईश्वरी ग्रंथाचा संदेश या प्रकरणांद्वारे इस्लाम धर्मावर लेखकांनी प्रकाश टाकलेला आहे. या ग्रंथाची इंग्रजी आवृत्तीही ('Islam : Maker of the Muslim Mind') या शीर्षकाखाली निघाली. यामुळे मोरे यांचे नाव आंतरराष्ट्रीय पातळीवर गेले. सामाजिक बंधुभाव, राष्ट्रीय एकात्मता व धार्मिक सामंजस्य साध्य करावयाचे असेल तर एकमेकांच्या विचारांना, धर्मांना समजावून घेणे आवश्यक आहे, अशी अद्वैतवादी भूमिका पार पाडणा-या लेखकांनी या ग्रंथाच्या माध्यमातून सर्वधर्मसमभावाची एक प्रकारे शिकवण दिली.

अबू बकर, उमर, उस्मान व अली या चार खलिफांचा काळ इस्लामचा सुवर्णकाळ म्हणून ओळखला जातो. याचे अभ्यासपूर्ण विवेचन लेखकांनी 'चार आदर्श खलिफा' या ग्रंथात केले आहे. ६५४ पृष्ठांचा हा ग्रंथ लेखकांच्या चिकाटी व प्रयत्नांची साक्ष देतो. हा ग्रंथ म्हणजे 'मुस्लिम

मनाचा शोध' या ग्रंथाचा पुढचा भाग आहे. 'काश्मीर : एक शापित नंदनवन' हा एक प्रदीर्घ पृष्ठसंख्या असलेल्या ग्रंथांपैकी त्यांचा एक ग्रंथ आहे. साठ वर्षांपासून काश्मिरचा प्रश्न भेडसावत आहे. दहशतवादाचे थैमान या भागात कित्येक वर्षांपासून चालू आहे. अजूनही हा प्रश्न मिटलेला नाही. निसर्गाचे वरदान लाभलेला काश्मीर अजूनही शापित आहे. काश्मीर प्रश्न स्वतंत्र भारतातील राष्ट्रीय प्रश्न आहे. काश्मीर प्रश्नांचे वास्तव असे दर्शन अतिशय तटस्थपणे शेषराव मोरे यांनी या ग्रंथातून घडविले आहे. या प्रश्नाचा ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करण्यासाठी काश्मिर दौरा करून तेथील ग्रंथालय व अभ्यासकांना त्यांनी भेटी दिल्या. जाणकारांचे लक्ष वेधून घेणारा हा ग्रंथ मैलाचा दगड ठरलेला आहे. '१८५७ चा जिहाद' हा ग्रंथही वैशिष्ट्यपूर्ण आहे. १८५७ चा लढा हे स्वातंत्र्ययुद्ध का जिहाद, याविषयी अभ्यासकांचे मतभेद, विचारकलह व अभिप्राय मे २००७ च्या सकाळमधून वाचण्यात आले. १८५७ चा जिहादच असल्याचे ठाम मत मांडून अभ्यासपूर्ण ग्रंथाची रचना त्यांनी केली.

'विचारकलह भाग एक व विचारकलह भाग दोन' हे दोन्ही ग्रंथ विविध विषयांवर व महापुरुषांच्या विचारांवर आधारित आहेत. भाग एकमध्ये "वसंत पळशीकरांचा जातीय कुरुंदकर", "डॉ. देशपांडे यांचा धार्मिक सावरकर", "डॉ. आंबेडकरांच्या मुस्लीम विचारांचा कसबेकृत विपर्यास", "डॉ. कसबे यांचा मनुवादी स्वातंत्र्यवीर", "भारतीय स्वातंत्र्यलढा : कोण जिंकले? कोण हरले?", "पांडुरंगशास्त्री : मनूचा आधुनिक अवतार" असे सहा दीर्घ लेख आहेत. यांत विस्ताराने विचारवंतांच्या विचारांवर साधक-बाधक भाष्य शेषराव मोरे यांनी केले. भाग दोनमध्ये छोटेखानी अनेक लेख आलेले आहेत. यातील "वेगळ्या वाटेने जाताना" या पहिल्याच लेखात काही दाहक अनुभव सांगितलेले आहेत. आज प्रत्येक जात स्वतःला श्रेष्ठ समजते, इतर जातीकडून अन्याय होत असल्याचे सांगते. माझी जात कुठल्यातरी जातीपेक्षा वरची आहे असे म्हणताना कुणीतरी आपल्या जातीला तुच्छ लेखतो, याचे त्याला काहीच वाटत नाही.

क्षणाक्षणाला विषमता जपणा-या जातीच्या संदर्भात मोरे लिहितात, "प्रत्येक जात एका बाजूने अन्यायग्रस्त तर दुस-या बाजूने अन्याय करणारी असते. खालच्या जातीपेक्षा श्रेष्ठ असल्याची जाणीव व त्याचबरोबर वरच्या जातीच्या वर्चस्वाला आव्हान या दोन्हीही गोष्टी प्रत्येक जातीला हव्या असतात. म्हणून आमच्या जातीवर अन्याय होतो आहे, ही प्रत्येक जातीची तक्रार असते. कोणतीच जात तक्रारमुक्त नसते."[४] (शेषराव मोरे, विचारकलह, भाग दुसरा, पृ. ४०) अजूनही जातीची मानसिकता बदलली नाही, ही शेषराव मोरे यांची खंत आहे.

'अप्रिय पण....' हा ग्रंथ विविध विषयांवर व प्रासंगिकपणे 'सामना' या दैनिकातून लिहिलेल्या स्तंभलेखांचा संग्रह आहे. अनेक विषय या ग्रंथात लेखकांनी चिकित्सकपणे हाताळलेले आहेत. फेब्रुवारी १९९७ ते मार्च २००० या काळात दर शुक्रवारी लेखकांनी सदर लेखन केले होते. यातूनच या ग्रंथाचा जन्म झाला. जाती प्राचीन काळीच जन्माला आल्या आहेत. दोन गटांत जेव्हा मतभेद होतात, तेव्हा दोन जाती पडतात. मग त्यांच्यात बेटीबंदी, रोटीबंदी वगैरे लागू होतात, असे शेषराव मोरे यांना वाटते. जातिसंदर्भातचा विचार लेखकांनी "ही पुरोगाम्यांची अस्पृश्यता काय कामाची?" या लेखातून वस्तुनिष्ठपणे मांडलेला आहे. या ग्रंथात जवळपास चाळीस लेख आहेत.

याच पुस्तकातील "शेतक-यांच्या दुःखाचे सनातन मूळ" हा लेख विशेषकरून प्रत्येकालाच भावण्यासारखा आहे. कारण ते वास्तव आहे. भारत हा कृषिप्रधान देश म्हणून ओळखला जातो. परंतु या देशात शेतक-यांचीच दयनीय अवस्था आहे. आत्महत्येचे प्रमाण तर दिवसेंदिवस वाढत आहे. शेतक-यांच्या मालाचा भाव सोडला तर, सगळेच स्वतःच्या मालाचा भाव स्वतः ठरवितात; परंतु शेतकरी मात्र ठरवीत नाही, हे फार मोठं दुःख आहे. शेतकरी कर्ज असतानाही पुनःपुन्हा सांगतो की, माझ्या जमिनीतील एक तुकडा किंवा कोपरा पिकला तर भरपूर पैसे मिळतील. हजारो वर्षांपासून तो कोपरा पिकतच नाही. पिकलाच तर त्याचे वाटेकरी किती आहेत? रात्रंदिवस स्वतः व कुटुंबातील सदस्यांच्या मेहनतीची बेरीज न करता तो राबत असतो. शेवटी मात्र काहीच शिल्लक राहात नाही. तरीही तो शेती विकत नाही. शेत विकणे म्हणजे अप्रतिष्ठेचे लक्षण आहे, असे त्याला










वाटायला लागते. "बाबा, हा प्रश्न आर्थिक नाही, भावनेचा आहे. शेतकरी शेती धंदा म्हणून करीत नाही, कर्तव्य म्हणून करतो. तो शेतीला माती, बैलाला पशू, तिफणीला वस्तू, नांगराला लाकूड मानीत नसतो; त्याकडे तो आई-मुलांच्या रूपात पाहतो. 'काळी आई' शब्द उगाच जन्मला नाही. तो शेतात नुसता घाम गाळीत नसतो. केवळ रक्त ओकीत नसतो, अंतःकरणच ओतीत असतो. घरी शेती असल्याशिवाय हे अंतःकरण तुम्हाला समजायचे नाही. म्हणूनच तो हिशोब ठेवून शेती करीत नसतो. भाव वाढवून द्या नाहीतर शेती विकतो, असे म्हणत नसतो. परवडत नाही म्हणून शेती न पिकविणे हेसुद्धा काळ्या आईला उपाशी ठेवणे मानतो." [५] (शेषराव मोरे, अप्रिय पण ...., पृ.२०७). वरील परिच्छेदात शेतक-यांच्या संदर्भात सत्य व वास्तव वर्णन शेषराव मोरे यांनी केले आहे.

या पुस्तकातील "माफ करा पांडुरंगशास्त्री!" नावाच्या पहिल्याच लेखात मात्र शेषराव मोरे यांनी एकांगी विचार मांडले. विचारकलह भाग २ मध्ये "पांडुरंगशास्त्री : मनूचा आधुनिक अवतार" हा एक शेवटचा लेख. याच लेखाचे शेषराव मोरे यांचे 'शासनपुरस्कृत मनुवादी : पांडुरंगशास्त्री आठवले' या शीर्षकाखाली ४८ पृष्ठांचे पुस्तक सुगावा प्रकाशनाने प्रकाशित केले.

मराठी, इंग्रजी, हिंदी, गुजराती व संस्कृत भाषांवर प्रभुत्व असलेले प. पू. पांडुरंगशास्त्री आठवले यांनी विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सामाजिक सुधारणेच्या दृष्टीने फार मोठी क्रांती केली. त्यांच्या कार्याचे वर्णन 'न भूतो न भविष्यती' असेच करावे लागेल. स्वाध्याय-कार्यातून पांडुरंगशास्त्री आठवले यांनी राष्ट्रीय एकात्मतेचे दर्शन घडविले. डोळस दृष्टीने सामान्यांपासून ते असामान्य माणसं, बलुतेदारापासून ते उच्च सुशिक्षित वर्गातील माणसं, स्वाध्यायकार्यातून निःस्वार्थपणे सेवा करीत आहेत. 'मी माणूस आहे' याची जाणीव करून देण्याचा प्रयत्न आठवले यांनी केलेला आहे. 'देना लेना बंद फिर भी आनंद' या उक्तीप्रमाणे स्वखर्चाने जात-पात, धर्म, गरीब-श्रीमंत असा भेदभाव न करता स्वाध्यायी एकत्रित भक्तिफेरी करून इतरांच्या सुखदुःखात सहभागी होतात. हा परिवार भारतातच नाही, तर इतर अनेक देशांतही पोचला. केवळ अध्यात्माचे चिंतन त्यांनी केले नाही.

'योगेश्वार कृषी', 'वृक्षमंदिर' 'अमृतालयम' व 'मत्स्यगंधा' इत्यादी अनेक कृतिशील उपक्रम त्यांनी राबविले. मन, बुद्धी आणि कृतीला उच्च बनविणे हे या परिवाराचे उद्दिष्ट आहे. यात केवळ ज्ञान नाही; तर प्रेम आहे. माणसाच्या मनातील न्यूनगंड काढून त्याच्यातील अस्मिता व तेजस्विता जागृत करण्याचे काम निःस्वार्थपणे व निष्ठेने त्यांनी केले. म्हणून हा परिवार आज लाखोंचा नाही तर कोटींचा झालेला आहे. कमी काळात या परिवाराचे रूपांतर वटवृक्षात झाले.

स्वाध्याय परिवारात शोषण नाही, सत्ता, संपत्ती व प्रसिद्धीचा हव्यास नाही. असे असतानाही पांडुरंगशास्त्री आठवले मनूचा आधुनिक अवतार कसे ठरतात? शक्यतो एकाच पुस्तकातील (संस्कृती चिंतन) सोयीची अवतरणे शोधून शेषराव मोरे यांनी आठवल्यांच्या विचाराचे खंडन केले. त्यांना पुरस्कार या एकाच पुस्तकामुळे मिळालेला नाही. त्यांच्या प्रवचनावर आधारित असंख्य पुस्तके निघालेली आहेत. 'तत्त्वज्ञान' नावाचे मासिक पंचेचाळीस वर्षांपासून सातत्याने चालू आहे. त्यांना काही राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळालेले आहेत. त्या रकमेचा उपयोग स्वहितासाठी त्यांनी कधीच केला नाही. मोरे लिहितात की, "पुरस्कार त्यांच्या डोक्यावर नव्हे, तर त्यांच्या चरणावर येऊन पडलेले आहेत, पडत आहेत."[६] (शेषराव मोरे, शासनपुरस्कृत मनुवादी : पांडुरंगशास्त्री आठवले, पृ. ३) डोक्यात असल्याशिवाय पुरस्कार चरणावर येऊन पडत नसतात. ज्यांच्या डोक्यात चांगले विचार आहेत त्याच व्यक्तीचा पदस्पर्श समाज करीत असतो. आज करोडो अनुयायी त्यांना वंदन करतात. स्वाध्यायमधील अनुयायी हे केवळ भोळेभाबडे नाहीत. आठवले यांनी माणसातला माणूस जागा करून त्याला विवेकी बनविले.

आंतरराष्ट्रीय कीर्तीचा 'टेम्पल्टन' पुरस्कार पांडुरंगशास्त्री आठवले यांना 'संस्कृतिचिंतन' या पुस्तकामुळे मिळाला नाही. १८-३-९८ ला 'सामना'मध्ये मोरे यांचा जो लेख प्रकाशित झाला, तो लेख 'अप्रिय पण' या पुस्तकात आहे. पुरस्कारांच्या संदर्भात शेषराव मोरे लिहितात, "त्यांना मिळत असलेले पुरस्कार या

त्यांच्या विचारांना दिलेले नसून त्यांच्या प्रत्यक्ष कार्याला दिलेले आहेत, हे समजावून घेण्याचा विवेक आपण जागृत ठेवला पाहिजे. या जागतिक कीर्तीच्या पुरस्कारांचा आधार घेऊन पुढील काळात त्यांच्या कुण्या शिष्योत्तमाने असा दावा मांडू नये की, शास्त्रींचे वरील विचार जगानेच मान्य केले आहेत व त्यांच्या या विचारांना मिळालेला हा पुरस्कार आहे. शास्त्रीजींच्या वरील विचारांसाठी हा पुरस्कार दिलेला नाही, हे सत्य कोणतीही पुरस्कार समिती जाहीर करणार नाही, किंवा स्वतः शास्त्रीजीही तसे सांगणार नाहीत."[७] (उनि., अप्रिय पण....पृ. १२) मोरे यांनी अतवरणे देऊन शास्त्रीजींच्या संदर्भात जे लिहिले आहे, ते वाचल्यानंतर पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या कार्याविषयी शेषराव मोरे यांच्या या विधानाचे आश्चर्य वाटते. या विचारांना हा पुरस्कार आहे असे कुणाच्या स्वप्नात व कल्पनेत नसतानाही ते असे का लिहितात? एखाद्या व्यक्तीतील ९५ टक्के गुणांवर चर्चा न करता ५ टक्के दोषांवर विस्ताराने भाष्य करण्याचा प्रकार शेषराव मोरे यांच्या संदर्भात झालेला आहे.

विचार महत्त्वाचे का कार्य महत्त्वाचे? विचारमंचावर येऊन विचार मांडणारे अनेक विचारवंत होऊन गेले. त्यामुळे समाजसुधारणा यशस्वी झालेली नाही. कृती ही केव्हाही महत्त्वाची असते. शेषराव मोरे यांनाही शासनाबरोबरच इतरही पुरस्कार मिळालेले आहेत. हे सर्व पुरस्कार विचाराला आहेत, कार्याला नाहीत हे अगदी कटू सत्य आहे. विचार व कार्य यांचा सुरेख संगम पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेला आहे. शेषराव मोरे यांनी पांडुरंगशास्त्री आठवले व स्वाध्याय परिवाराचा सूक्ष्मपणे सर्व अंगाने अभ्यास केल्यास ते निश्चितच मोठा ग्रंथ लिहितील.'विचारकलह' मधील प्रस्तावनेत पांडुरंगशास्त्रीवरील लेख दुःखाने, पोटतिडकीने व सहन होत नसल्यामुळे मी लिहीत आहे असे शेषराव मोरे सांगतात. असा कुठलाच अन्याय, भ्रष्टाचार, गुंडगिरी, शोषण शास्त्रीजींनी केलेले नाही. त्यामुळे लेखकाला एवढे दुःख वाटण्याचे कारण नव्हते.

शेषराव मोरे यांनी प. पू. पांडुरंग आठवले यांच्या व्याख्यानांवर आधारित निघालेल्या 'संस्कृतिचिंतन' या पुस्तकाच्या आधारे आठवले मनुवादी कसे आहेत, हे सांगण्याचा प्रयत्न केला. आठवले यांचे संपूर्ण कार्य व विचार बुद्धीच्या कसोटीवर तपासण्यात शेषराव मोरे कमी पडल्यासारखे वाटते. 'संस्कृतिपूजन', 'तरुण', 'खरोखरच आपण सुधारलो आहोत काय?', 'गीतापाथेय', 'त्रिकालसंध्या', 'गीतेचे पंचप्राण', 'जीवनतीर्थ', 'श्री पांडुरंगाष्टकम', 'भारतीयांचे सांस्कृतिक आदर्श जीवन', 'श्री वाल्मीकी रामायण दर्शन', 'एष पन्था एतत्कर्म', जीवनात कशाची उणीव आहे? तसेच ५० वर्षांपासून मुंबईहून निघणारे 'तत्त्वज्ञान' मासिक यात अतिशय मौलिक व प्रेरणादायी विचार आलेले आहेत. त्यांविषयी लेखकाला काहीच लिहावेसे वाटले नाही.

'संस्कृतिचिंतन' प. पु. पांडुरंगशास्त्री यांचे अतिशय सुरुवातीचे पुस्तक आहे. इ. स. १९५८ साली आठवले यांनी एका शिबिरात तरुणांसमोर मांडलेले विचार यात आहेत. त्यांच्या चिंतनिका किंवा प्रवचन अनुयायी संकलन करीत असतात. शब्दांकन करीत असताना विचार मागे-पुढे होण्याची शक्यता असते. शेषराव मोरे यांनी 'शासन-पुरस्कृत मनुवादी पांडुरंगशास्त्री आठवले' या पुस्तकाच्या अखेरीला 'संस्कृतिचिंतन' या पुस्तकात दिलेली या विषयावरील इंग्रजी पुस्तकांची यादी देऊन म्हटले आहे की, 'यात भारतीय विद्वानांचा एकही ग्रंथ नाही.' यातून मोरे यांना नेमके काय सांगायचे होते? आठवले यांना परदेशात राहण्यासाठी अनेक श्रीमंत व्यक्तींनी विनंती केली होती. परंतु ते भारतीय संस्कृतीचे पूजक होते, म्हणून त्यांनी ते नाकारले. भारतीयांचे पाश्चात्त्यीकरण झाले पाहिजे, असेही त्यांचे मत नाही. समाजशास्त्र, राज्यव्यवस्था, अर्थशास्त्र व शिक्षणव्यवस्था या चार भागांतील दहा प्रकरणांची चिकित्सा करताना त्यांनी पाश्चात्य अभ्यासकांची मते दिली आहेत. धर्माची चिकित्सा पाश्चिमात्त्य विचारवंतांत कुणी केली? समाजवाद युरोपातून कसा विस्तारला? तेराव्या आवृत्तीतील ४१ व्या पृष्ठावर त्यांनी आर्थिक आणि सामाजिक समता आणण्याचे श्रेय कार्ल मार्क्सकडे दिले. पाश्चिमात्य अभ्यासकांचे संदर्भ देताना आठवले यांनी भारतीय संत, महापुरुष, विचारवंत व समाजसुधाकांचे खच्चीकरण केले नाही. विवाहासंदर्भात आठवले यांनी मांडलेले अनेक विचार मूलगामी आहेत. 'भाववंदना'मध्ये 'संस्कृतिचिंतन' या पुस्तकाच्या

सुरुवातीलाच प्रकाशकाच्या वतीने हे पुस्तक परिपूर्ण पुस्तक नाही, काही दोषही यात असू शकतात, असे नम्रपणे लिहिले आहे. प्राथमिक विचार व लेखनातील दोष अनेकदा मान्यही करावे लागतात.

पाश्चात्त्य अभ्यासक बुद्धीला प्राधान्य देतात. ते भावनेला आवाहन करीत नाहीत, असे आठवले यांना वाटते. कारण ज्ञानाबरोबरच प्रेमही महत्त्वाचे आहे. त्याशिवाय माणूस माणसाला जोडला जात नाही. 'आज का विकृत शिक्षण' या नवव्या प्रकरणात पांडुरंगशास्त्री आठवले यांनी वर्तमानकालीन सत्य डोळ्यांसमोर ठेवून विचार मांडले आहेत. आठवले लिहितात, "आज का बुद्धिमान, महान और उत्कृष्ट वर्ग शिक्षणक्षेत्र के बाहर है। जिसको दूसरे क्षेत्र में नोकरी नहीं मिलती वह अन्त मे शिक्षक होता है।" [८] (पांडुरंगशास्त्री आठवले, संस्कृति-चिंतन, पृ. २०६) वरील अवतरणाची चर्चा शेषराव मोरे यांनी आपल्या 'शासन पुरस्कृत....' या पुस्तकातील पृ. ३३ व ३४ वर केली आहे. इतर वर्गांतील लोक शिक्षक बनत आहेत. अध्यापनाच्या क्षेत्रात ब्राह्मणच असावेत असे आठवले यांना वाटत असावे, असा निष्कर्ष शेषराव मोरे काढतात. येथे तत्कालीन वास्तव परिस्थिती लक्षात घ्यायला हवी. सद्यःपरिस्थिती पाहिल्यानंतर लक्षात येते की, हुशार मुले बारावीनंतर इंजिनिअरींग, एम. बी. बी. एस. कडे जाताना दिसतात. डी. एड्. ला कला शाखेतील विद्यार्थीच अधिक असतात. याचा अर्थ या शाखेतील विद्यार्थी हुशार नसतात असे नाही. जवळपास सत्तर टक्के पदवीधर विद्यार्थ्यांना वाटते, की आपण बी. एड्. झाले पाहिजे. पदव्युत्तर शिक्षणानंतर सेट-नेट किंवा पीएच. डी., पुन्हा अधिव्याख्याता यासाठी धडपड चालू असते. सगळेच शिक्षक निष्ठावंत असतात असे नाही. केवळ पैशासाठी नोकरी करणारे काही शिक्षक शिक्षणक्षेत्रात आहेत. खाजगी महाविद्यालयात देणगी देऊन बी.एड. ला प्रवेश घेता येतो. एम. पी. एस. सी; यू. पी. एस. सी व इतर स्पर्धापरीक्षांत मात्र ते चालत नाही. येथे अधिक परिश्रम करणारे विद्यार्थीच यशस्वी होतात. म्हणून आठवले यांनी मांडलेले विचार चुकीचे नाहीत; पण याचा अर्थ शिक्षणक्षेत्रातील शिक्षक बुद्धिवान नाहीत, असे नाही.

आठवले यांनी अनेक शैक्षणिक प्रयोग केले. 'बालसंस्कार केंद्र', १९५६ साली स्थापन केलेले ठाणे येथील 'तत्त्वज्ञान विद्यापीठ' आदीचा समावेश यात करता येईल. या विद्यापीठात प्रवेशासाठी विद्यार्थ्यांना परीक्षा द्यावी लागते. तेथे विद्यार्थ्यांकडून भोजनाचा व राहण्याचा कुठलाच खर्च घेतला जात नाही. "तत्त्वज्ञान विद्यापीठ जिवंत जीवनशाळा आहे. आजच्या शिक्षणसंस्था मानवाला व्यवसाय किंवा नोकरीसाठी तयार करतात. विद्यार्थ्यांत मानवी गुण फुलावेत यासाठी कोणाचेही प्रयत्न नाहीत. शिक्षणाचा हेतू केवळ अर्थप्राप्ती बनला आहे. व्यवसायलक्ष्यी शिक्षणामुळे शिक्षण पूरे होताच विद्यार्थ्यांत शोषणवृत्ती निर्माण होते, त्याचे हृदय भावशून्य बनते. तो स्वार्थपरायण होतो."[९] (पांडुरंगशास्त्री आठवले, एष पन्था, एतत्कर्म, पृ. ५८) शिक्षणात नैतिकतेचे धडे हवेत. स्वाध्याय व पांडुरंगशास्त्री आठवले यांचे विचार व कार्य समजावून घेण्यासाठी 'एष पन्था एतत्कर्म' सारखे पुस्तक पाहणे गरजेचे आहे. "विद्यमान युगातील धर्म व अध्यात्मातील प्रदुषण, वायू प्रदूषण, जल प्रदुषण, भूमी प्रदुषण, ध्वनी प्रदुषण, उष्मा प्रदूषण, किरणेत्सर्गीय प्रदूषण, अंतराळ प्रदूषण व लोकसंख्यावाढ हा प्रदूषित मनाचाच प्रताप आहे. म्हणूनच या जगातील मानवाला मनासह सर्वांगाने विशुद्ध व विहंगम जीवन जगण्याचा स्वाध्यायमंत्र अन् स्वाध्याय जीवनप्रणाली दादांनी प्रदान केली. शुद्ध मनाद्वारेच विशुद्ध वृत्ती आणि कृती शक्य आहे. हे मानसशास्त्र हा स्वाध्यायाचा प्राण आहे." [१०] (सावळीराम तिदमे, माझ्या नजरेतून प. पू. पांडुरंगशास्त्री आठवले, पृ.११) असे स्वाध्यायाचे मूल्यमापन सावळीराम तिदमे यांनी केले आहे. 'माझ्या नजरेतून प. पू. पांडुरंगशास्त्री आठवले' हे ४७४ पृष्ठांचे पुस्तक प. पू. पांडुरंगशास्त्री आठवले यांच्या कार्यावर विस्ताराने प्रकाश टाकणारे आलेले मौलिक पुस्तक आहे.

'अप्रिय पण... या पुस्तकातील "अंधश्रद्धा निर्मूलकांचा वैचारिक गोंधळ" या लेखाच्या शेवटी वैचारिक गोंधळ दूर करा, खरे अंधश्रद्धा निर्मूलक बना! अशी सूचना किवा आदेशवजा लेखन लेखकांनी केले. जे पटत नाही त्यावर मुक्त वाद, चर्चा करणे यालाच विचारकलह म्हणतात. असे 'विचारकलह भाग २' या पुस्तकातील

